

# अंधारदेवी

लेखक

**दि. बा. मोकाशी**



# अंधारवारी

लेखक :
दि. बा. मोकाशी

•

चित्रकार :
अनंत सालकर

आवृत्ती पहिली
१६ सप्टेंबर १९६५

किंमत २ रुपये

प्रकाशक :
वा. शा. इनामदार
इनामदार बंधु प्रकाशन
९९१ सदाशिव पेठ, पुणे २

मुद्रक :
वि. स. लाटकर
कल्पना मुद्रणालय
' शिव-पार्वती '
४६१।४ सदाशिव, पुणे २






अ नु क्र म



| | |
|---|---|
| १. खरी न वाटणारी हकीकत | ४ |
| २. हिमालय | |
| ३. खादाड देवता | १२ |
| ४. दरीत उडी | १६ |
| ५. अजब देश | २० |
| ६. अद्‌भुत प्रवास | २६ |
| ७. अतर्क्य माणसे | ३० |
| ८. संघर्ष | ३४ |
| ९. सेवकांचं गुपित | ३८ |
| १०. कारखाना | ४२ |
| ११. एक नवी ओळख | ४६ |
| १२. नको झालेला मी | ५२ |



खरी न वाटणारी ही हकीकत एका म्हाताऱ्यानं आम्हांला सांगितली.

नेपाळच्या पोलिसांनी या म्हाताऱ्याला आमच्या बंगल्यावर आणला. आमच्या म्हणजे नेपाळमधील भारतीय वकिलातीवर आणला. या वेळी सुदैवानं मी वकिलाचा पाहुणा होतो. आम्ही दोघे फार जुने मित्र. भारताचा वकील म्हणून नेपाळात त्याची नेमणूक झाल्यावर अनेक दिवस तो मला बोलावीत होता.

आम्ही संध्याकाळी व्हरांड्यात खुर्च्या टाकून बसलो होतो नि पोलिसप्रमुख त्या म्हाताऱ्याला घेऊन आला. पोलिसप्रमुखाच्या हकीकतीवरून हा म्हातारा त्यांना दरीच्यावर थकून पडलेला मिळाला. तो हेर असावा असा त्यांना संशय आला. मराठी, हिंदी अशा दोन भारतीय भाषा त्याला येत होत्या, शिवाय इंग्रजी. दोन दिवस प्रश्नांचा मारा करूनही हेर असल्याची कबुली त्यानं दिली नाहीच, पण तो काही तरी विचित्र हकीकत सांगू लागला.

जिथं हा म्हातारा सापडला ते ठिकाण हिमालयाच्या खूप आत, पोटात होतं. पण ही आतली ठिकाणंही आता फार महत्त्वाची ठाणी होऊन बसली होती. चिनी सैन्याची एक अगदी लहान तुकडी काही

१.

# खरी न वाटणारी हकीकत



दिवसांपूर्वी तेथपर्यंत येऊन माघारी गेली होती. म्हाताऱ्याबद्दल त्यामुळं अधिकच संशय वाटत होता. म्हाताऱ्याच्या एकंदर माहितीवरून तो भारतीय होता हे ठरल्यामुळं, अधिकाऱ्यांनी त्याला इथं आणला.

माझ्या मित्राने दोघांना बसवून घेतलं नि म्हाताऱ्याला प्रश्न विचारण्यास सुरुवात केली. पहिल्या काही वाक्यांतच आमच्या ध्यानात आलं की, त्याची मातृभाषा आमच्याचप्रमाणं मराठी आहे. त्यामुळे त्यानं स्वतःविषयी जी प्राथमिक माहिती सांगितली, ती खरी की खोटी हे कळायला आम्हांला मुळीच वेळ लागला नाही.

मी त्याचं आडनाव उघड करीत नाही. पण त्याचं नाव पांडुरंगपंत असून वय ब्यासष्ट होतं. त्याचं सर्व आयुष्य महाराष्ट्रात गेलं होतं. पेन्शन घेतल्यानंतर तो जळगावला राहात होता. त्याची पत्नी सहासात वर्षांपूर्वीच वारली. मुलं-मुली व्यवस्थित मार्गाला लागलेली होती. पत्नीच्या दुःखानं असेल, एके दिवशी त्याच्या ध्यानात आलं की, आपली दृष्टी अतिशय कमी झाली आहे. दोन तीन दिवस त्यानं डॉक्टरांकडे जाऊन डोळे तपासूनही घेतले. पण अधू होणारी त्याची नजर पुढील तीन दिवसांत अजिबात गेली. पुढच्या वैद्यकीय तपासणीत त्याची दृष्टी आता येणार नाही असं ठरलं.

त्या वेळी साठी उलटून तो आयुष्यातल्या शेवटच्या कालखंडात प्रवेश करीत होता. ज्या वयात आधीच परावलंबी व्हावं लागतं, त्या वयात दृष्टी जाताच त्याला फारच मोठा धक्का बसला. तीन दिवस तो कुठे बाहेर पडला नाही. आपलं काय करावं हेच त्याला कळेना. कित्येकदा आत्महत्येचे विचारही त्याच्या डोक्यात आले. जिथं आपण डोळस म्हणून वागलो, त्या आपल्या गावात काठीनं

चाचपडत, दुसऱ्यानं हाताला धरून रस्ते ओलांडीत जायचं ही कल्पनाच असह्य होती. चारसहा दिवसांत जरी तो घरातल्या घरात फिरू लागला, तरी बाहेर पडण्याची त्याला हिंमत होईना.

एके दिवशी रात्री अशाच मनाच्या तगमगीत असता त्याला एकदम येथून कुठं तरी दूर जाण्याची कल्पना सुचली. मनाला शांती मिळण्याच्या दृष्टीनं हाच एक उपाय आपल्याला आहे, हे अधिक विचारा-अंती त्याला पटलं.

आणि म्हणूनच तो हिमालयात आला. हिमालयाच्या कठीण यात्रा आता आपल्याला करता येणार नाहीत; पण हिमालयाच्या पवित्र वातावरणात राहता येईल, असं त्यानं ठरवलं. त्यान एक लहानशी झोपडी घेतली नि तो एकटाच राहू लागला. त्या झोपडीचा पत्ता, झोपडीचं खरेदीपत्र हे सर्व त्यानं खिशातून आम्हांला काढून दाखवलं.

पोलिस अधिकाऱ्यांनी सुद्धा ते पाहिलं होतं. अशी कागदपत्रं बनवता येतात हे त्यांना ठाऊक होतं. पण म्हाताऱ्याची हकीकत मला व मित्रालाही संपूर्ण खरी वाटली. माझ्या मित्रानं बोलता बोलता जळगाव, पुणे, मुंबई, नागपूर इथल्या गोष्टी काढल्या आणि त्या बोलण्यात ज्या व्यक्तींची नावं त्यानं घेतली त्यांतल्या काही व्यक्ती आमच्या दोघांच्या परिचयाच्या निघाल्या. एवढंच नव्हे, तर अगदी अनाहूतपणे त्यानं त्या व्यक्तींची आम्हांला ठाऊक असलेली माहिती सांगितली. त्या सर्व व्यक्ती चांगल्या अधिकारावरच्या, जबाबदार होत्या.



" तुमची खात्री झालीय का हा हेर नाही ? " पोलिस अधिकाऱ्यानं विचारलं.

माझा मित्र म्हणाला,

" हे गृहस्थ हेर नाहीत. तुम्ही निश्चिंत असा. "

" तुम्ही त्यांची जबाबदारी घेता ? "

" होय. "

एक सलाम ठोकून व हस्तांदोलन करून अधिकारी निघून गेला. तो गेल्यावर माझा मित्र म्हाताऱ्याला म्हणाला,

" पांडुरंगपंत ! तुमच्या खाण्यापिण्याची प्रथम सोय करतो. मग आपण बोलू. "

रात्रीचं जेवण आम्ही सर्वांनी एकदमच घेतलं. पुन्हा आम्ही ऱ्हरांड्यात येऊन बसलो. माझा मित्र म्हणाला,

" पांडुरंगपंत, आता बोला ! तुम्ही हिमालयात इतक्या आत कुठं गेला होता ? तुमचं वय पाहून तुमची प्रवासाची आवड जरा विचित्र वाटते ! "

म्हातारा हसून म्हणाला,

" तुम्ही हा प्रश्न विचारणार असं मला वाटलंच होतं. पण त्याचं उत्तर इतकं सोपं नाही. "

" म्हणजे ? "

" म्हणजे असं की, उत्तर देणं सोपं आहे, पण ते पटणं कठीण असल्यामुळं सोपं नाही. "

" का पटणार नाही ? "

" मी जर तुम्हांला सांगितलं की, खालच्या दरीतून मी वर चढून आलो, तर तुम्हांला खरं वाटेल का ? "

" शक्यच नाही. त्या दरीतून वर यायला आमचे जवानसुद्धा चाचरतील. "

" मग मी त्या दरीतूनच वर आलो. "

इतका वेळ अगदी सौम्य, गोड, आतिथ्यशील असा माझा मित्र एकदम कडक होत म्हणाला,

" पोलिसांना सांगत राहिलात ते इथं सांगू नका. मी तुम्हांला त्यांच्या हातून वाचवलंय हे विसरू नका. खरी हकीकत मला पाहिजे.–"

म्हातारा पुन्हा हसला.

" कोर्टापुढे सांगतात तसं मी सांगतो – खरं सांगेन देवाशपथ खरं बोलेन. "

" बर्फानं भरलेल्या नि जंगलानं व्यापलेल्या दरीतून तुम्ही वर आला, हे खरं बोलणं आहे ? "

" अगदी खरं आहे. तुम्ही माझी सर्व हकीकत ऐकायला वेळ दिलात, तर चांगलं होईल. माझी सर्व हकीकत ऐका नि मग संशय घ्या. ती हकीकत इतकी विचित्र आहे की, ती ऐकून कदाचित माझ्यावरचा तुमचा सर्व विश्वास उडेल. जर आधी हीच हकीकत मला कुणी सांगितली असती, तर मी त्याला थापाड्यात काढलं असतं. पण माझी हकीकत तुम्हांला खोटी वाटली तरी मी अनुभवलं ते जगाच्या कानावर जाईल."

"बोला." माझा मित्र म्हणाला.



" ऐका! मी हिमालयात आंधळा होऊन आलो नि झोपडी घेऊन राहिलो. इथं आल्यावर माझं मन अगदी मोकळं झालं. मी निःसंकोच काठी घेऊन हिंडू लागलो. माझी दाढी वाढली आणि कमीत कमी व्याप व्हावा यासाठी धोतर आणि कफनीवजा सदरा हा पोशाख मी ठेवला. मला लोक बाबाजी म्हणू लागले.



इथं येऊन आध्यात्मिक होण्याचा माझा बेत नक्की नव्हता. ते माझं क्षेत्र नव्हतं. पण हिमालयातल्या गंभीर रात्रीत मी नकळतच जप करणं, भजन करणं

२.

# हिमालय



अशा गोष्टींत सुरुवात केली. माझ्या आंधळ्या आयुष्यात मला रमवतील अशा कोणत्या गोष्टी होत्या ? झोपडीच्या दरवाजात बसून हिमालयात वेगवेगळ्या ऋतूंतलं संगीत ऐकायला मी शिकलो. एका शेरपाला मी सकाळ-संध्याकाळ कामाला ठेवलं. मला आसपास हिंडवावं एवढंच त्याचं काम. हळूहळू त्याच्या हाताला न धरता माझ्या झोपडीच्या आसपासचा बराचसा भाग हिंडता येईल इतका सराव मी केला. दृष्टी गेल्यावर आपण इतके दिवस लक्ष न दिलेल्या लहानसहान गोष्टी कशा लक्षात ठेवू लागतो, याची मला गंमत वाटू लागली.

वर्षानंतर शेरपाची मला जरूर भासत नाहीशी झाली. माझ्या मनःस्थितीत एकटं फिरणं, कुठं तरी एकटं बसणं मला हवं होतं. मला वेळेचं, अंतराचं बंधन नको होतं. शेरपा सुटताच मला ते स्वातंत्र्य मिळालं.

एखाद्या शिळेवर किंवा झाडाच्या मुळांवर भोवतालचा न दिसणारा निसर्ग पहात बसणं यातही आनंद होता. वारा असला तर पानांचे सळसळ आवाज येत. मधूनच पक्षी ओरडत. एखादी खेळत्या निसर्गाची किंचाळी ऐकू येई. मधूनच कुठं तरी पाचोळा खळखळत जाई. ढग असले तर माझ्या अंगावर ऊन-सावलीचा खेळ सुरू होई. उन्हाचे दूरच्या बर्फावरून येणारे कवडसे माझ्या आंधळ्या डोळ्यांनाही कळत. हाताला येणारी पानं खुडून मी त्यांचा आकार चाचपडे नि वास घेऊन पाही. वेली-झुडुपांत वाट गेली की उग्र वासावरून मला त्या वनस्पतींची कल्पना येई. डोळस असताना जर वनस्पतीचा मी अभ्यास केला असता तर किती बरं झालं असतं !

माझ्या अशा या हिंडण्यात नि बसण्यात दिवस मावळून जाई. कधी माझं हृदय आनंदानं भरून येई, तर कधी दुःखानं.

या जीवनात गंमत होती, तरी हळूहळू तिथल्या तिथं हिंडणं मला कंटाळवाणं वाटूं लागलं. जंगलातल्या वाटा किंवा एकूण जंगलच लांबून भयंकर वाटतं. पण तुम्ही एकदा तिथं हिंडून सरावलात की त्याची भयाणता कमी होते. जंगलातल्या वाटांनासुद्धा पद्धत असते हे ध्यानात येऊ लागतं. पायाला होणाऱ्या स्पर्शानं पाऊलवाट वळलेली कळते. पुढे चढ किंवा उतार आहे हे कळतं. वासावरून नि स्पर्शावरून काटेरी वनस्पती कळू लागतात. त्यामुळे माझे ठराविक मार्ग सोडून मी जरी दूरदूर जाऊ लागलो तरी मला तसं त्रासाचं झालं नाही.

त्या दिवशी चार-पाच मैलांच्या चालीनंतर मी एके ठिकाणी एकदम थांबलो. तोंडावर आलेल्या वाऱ्यानं डोंगर संपून कडा आल्याची जाणीव मला दिली. मी तसाच काठी रोवून, डोळ्यांना न दिसणारी खालची दरी पाहू लागलो.

आणि पाहता पाहता या चार वर्षांत कधी न आलेल्या भावना होऊ लागल्या. तुम्हांला खोटं वाटेल, पण मला दरीत उतरणारी पाऊलवाट कळू लागली. माझ्या पायांच्या आसपासचा वीस फुटांचा रस्ता कसा आहे तो मला कळू लागला.

'कळू लागला' असं मी म्हणतोय हे लक्षात घ्या. दिसू लागला नाही. रस्ता कळू लागल्याची ही भावना मला खरोखरीच नीट सांगता यावयाची नाही. पुढच्या वीस फुटांतील गवताचा रंग मला कळत नव्हता, पण गवताची उंची, त्याचं वाऱ्यानं हलणं मला कळत होतं. दहा फुटांवरच्या दगडाचा आकार मला सांगता आला असता.



दिसण्याचा हा प्रकार डोळ्यानं दिसण्याचा नव्हता. अगदी निराळा होता. म्हणूनच मी चकित झालो.

आपल्याला पुढच्या पावलातल्या ज्या वस्तू दिसताहेत त्या खऱ्याच आहेत की काय, हे पाहण्याचं मी ठरवलं. हळूहळू काठीनं चाचपडत मी पुढं गेलो. आणि बरोबर दहाव्या पावलावर माझ्या काठीचा दगडावर आवाज आला. बसून तो दगड मी चाचपला. तो दगड होता. एवढंच नव्हे, तर मला लांबून कळला होता त्याच आकाराचा होता.

तुम्ही ऐकताना आता चकित झाला आहात, मी किती चकित झालो असेन ! मला किती आनंद झाला असेल !



त्या आनंदातच मी घराकडे परत आलो. झोपडीत त्या दिवशी मला झोप आली नाही. मी कड्यापासून परतल्यावर पुन्हा पहिल्यासारखंच - चाचपडत आलो होतो हे खरं होतं. पण कुठं तरी पुढचे पदार्थ मला कळताहेत हे समाधान काय कमी होतं !

मी रोज त्या ठिकाणी जाऊन माझ्या नव्या 'दृष्टि'लाभाचा आनंद घेऊ लागलो. रोज तिथं जाताच दहादहा पावलं अधिक अधिक पुढं जाऊ लागलो. मी जसजसा पुढं जात होतो तसतशी माझी दिसण्याची भावना वाढत होती. म्हणजे कड्यावर मला दहा फुटांवरच कळत होतं, तर कडा उतरू लागताच पंधरा-वीस फुटांवरचं कळूं लागलं होतं. लहान मुलासारखा या 'दृष्टीशी' मी खेळत होतो. एखादं पुढचं झुडूप हेरून ठेवावं नि पुढे जाऊन हातानं चाचपडून खरोखरीच ते तिथं आहे, याची खात्री पटताच अक्षरशः मी त्या झुडुपाला कुरवाळावं असं चाललं होतं.



चार दिवसांनंतर मी माझ्या शेरपा गड्याला बोलावणं धाडलं. तो येताच मी त्याला त्या कड्याची नि विचित्र दिसण्याची हकीकत सांगितली. आपल्या भाषत दोन तीन वेळा देवाचं नाव घेऊन तो म्हणाला,

"बाबाजी ! तिथं पुन्हा जाऊ नका."

३.

# खादाड देवता



" का रे ? "

" तिथं अरण्यातल्या देवता आहेत. त्या फार खादाड आहेत. तिथं आमची जनावरं गेली की, ती परत येत नाहीत. त्याला आम्ही आंधळ्याची दरी म्हणतो. तिथं जाऊ नका. तो भयंकर कडा आहे. आम्ही दिवसासुद्धा तिकडे वळत नाही. तिथं आंधळ्यानं जाणं तर फार वाईट ! आंधळा परत येत नाही. "

त्याचं बोलणं ऐकता ऐकताच मी पुन्हा तिकडे जाण्याचं मनात ठरवलं. शेरपा गेल्यावर रात्रभर विचार केला. शेरपा म्हणाला, तसा धोका तर मला तिथं दिसत नव्हता. समजा असलाच तर माझं आणखी वाईट काय होणार होतं ? आपण जर तिथं दरीत कोसळलो तर दृष्टी येत असल्याच्या आनंदात मरू. आंधळा राहून आणखी वीस वर्षं जगण्यापेक्षा असं मरण काय वाईट ?

दुसरं असं की हा दिसण्याचा विचित्र प्रकार काय आहे, हे शोधून काढल्याशिवाय मला चैन पडणं शक्य नव्हतं. एका बाजूनं पाहता हा 'दृष्टी'चा अपघात माझ्या जीवनात अगदी योग्य वेळी आला नव्हता का ? चार वर्षं पाऊल पाऊल चाचपडत जाणाऱ्या माझ्या शरीराला आता हे धाडस हवेहवेसे वाटले तर नवल काय ? म्हणूनच आता त्या कड्यावर गेल्यावर त्या प्रकाराचा छडा लावल्यावाचून परत फिरायचं नाही असं मी ठरवलं.

दोन दिवस मी निघण्याची तयारी केली. एके दिवशी खाण्यासाठी चारसहा दिवस पुरतील अशा भाकऱ्या बडवून घेतल्या. मग पाण्याचा एक हलकासर तांब्या भरून घेतला. थंडीसाठी अंगावर होते तेवढे जाड लोकरीचे कपडे घातले व एक रग गुंडाळून पाठीला अडकवता येईल असा बांधला.

नंतरचा दिवस मी विश्रांती घेतली. रात्री झोपताना झोपडीत एक चिठ्ठीही

मी लिहून ठेवली. मी परत आलो नाही तर माझ्या मुलांना माझा शेवट कळावा.

पहाटे मी बाहेर पडलो आणि साधारण उजाडता कडयाशी आलो. कडयाशी येऊन मी नेहमीसारखा थांबलो नाही. जिथं वाट उतरताना मला कळत होती तिनं उतरू लागलो. ''

माझ्या वकील मित्रानं मध्येच त्यांना थांबवून प्रश्न केला,

"तुम्ही ज्या ठिकाणाहून उतरला म्हणता, ते ठिकाण तुम्ही जिथं सापडलात त्यापासून निदान पंचवीस मैल अलीकडे होतं, हे कसं?"

म्हातारा हसून म्हणाला,

"त्याला मी काय करणार? त्या लोकांनी मला जिथं आणून सोडलं, तिथं मी आलो."

एकदम मित्रानं ओरडून विचारलं,

"म्हणजे चिनी सैनिकांनीच ना?"

म्हातारा शांतपणे म्हणाला,

"नाही. ते चिनी नव्हते."

"मग कोण होते?"

"ते आंधळे होते एवढंच मला सांगतां येईल."

आम्ही दोघे उद्गारलो,—

"आंधळे?"

म्हातारा म्हणाला,



"मी चिनी हेर आहे किंवा चिनी सैन्याशी माझा संबंध आला हे वेड डोक्यातून काढून टाका. पुन्हा पुन्हा तुम्हांला मी सांगतोय की मी जे काही पाहिलंय ते इतकं विचित्र आहे की तुमचा माझ्याबद्दलचा संशय मला पोरकट वाटतो आहे. तुम्ही मोठे अधिकारी आहात, मीही एक लहान अधिकारी होतो. चिनी प्रश्नानं तुम्ही आता ग्रासले आहात. आपण जे काही

रोज अनुभवतो त्याहून निराळं ऐकण्याची आपल्या मनाची तयारी नसते. तसं करू नका. मोकळं मन करून माझी हकीकत ऐका. ”

त्यानंतर शेवटपर्यंत माझ्या मित्रानं त्यांना एकदाही छेडलं नाही. तो सांगत राहिला नि आम्ही थक्क होऊन ऐकत राहिलो.

तो म्हणाला,

“ मी डोळस असतो, तर त्या दरीत उतरण्याची मला नक्की हिंमत झाली नसती. सह्याद्रीतल्या दऱ्यासुद्धा आपल्याला भयाण वाटतात. दरीत उडणाऱ्या घारीसुद्धा तिथे खोल उडत असतात. पण जिथे तुमचे जवान कचरतील ती दरी मी भरभर उतरू लागलो. प्रथम दहा पंधरा फुटांवरची वाट मला कळत होती. मी निम्म्या दरीत उतरलो नि मला दरीतला प्रदेशही थोडा थोडा कळू लागला.

पुन्हा मी सांगतो की, आपण म्हणतो तसं मला दिसत नव्हतं. वस्तूंचं रंगरूप कळत नव्हतं, पण मला सर्व कळत होतं – इतकं स्पष्ट कळत होतं की, डोळे असताना तसं मला कधी दिसलं नसतं. माझी हालचाल अतिशय मोकळी होत होती. जसजशी पावलं दरीत उतरत होती, तसतसा पावलांचा जमिनीवरचा दाब कमी होत आहे असं वाटत होतं. रबराच्या स्पंजावर चालावं तसं म्हणा ना. पण स्पंजावरसुद्धा आपलं वजन पडतं. इथं शरीराचं जमिनीवर पडणारं वजन कमी होत चालल्यासारखं वाटत होतं.





**न** दिसता कळणं नि वजन कमी वाटणं या दोन्ही गोष्टी नीट सांगणं कठीण आहे. पण मी जसजसा दरीच्या तळाशी येत चाललो, तसतसं कळण्याचं स्वरूप मला काहीसं कळू लागलं. या कळण्याचा पहिला परिणाम कपाळाला धरून डोक्याभोवती जो पट्टा होईल तो भाग दुखू लागण्यात झाला. डोक्यात चहूबाजूनं काही तरी ताण पडतोय असं मला वाटू लागलं. डोळे दुखू लागले की आपण मिटून विश्रांती घेतो, तसे मी माझे आंधळे डोळे मिटले. पण त्याचाही काही उपयोग झाला नाही. मी डोकं हातानं झाकलं, चेपलं. पण कळण्याची भावना बंद झाली नाही. भोवतालच्या पदार्थांमधून काही तरी येऊन माझ्या डोक्यात असंख्य बिंदूंनी शिरत होतं एवढंच मला कळत होतं. पण प्रकाशकिरणासारखे हे बिंदू नव्हते. यांना हेलकावे होते, लाटा होत्या.

कळण्याची ही भावना मला अधिक चिकित्सेनं पाहता आली असती, पण दरीत उतरल्यावर मी काही काळ विसावा घेतला. त्या विसाव्यात माझं डोकं दुखण्याचं हळूहळू कमी झालं. ते जेव्हा अजिबात नाहीसं झालं तेव्हा कळण्याच्या भावनेशी माझी इतकी एकरूपता झाली की, दिसतं हे जसं आपल्याला न

४.

# दरीत उडी



कळत दिसतं, तसं माझं कळणं मला नकळत कळू लागलं. त्या बाबतीत चिकित्सा करण्याची माझी शक्ती गेली.

विश्रांतीनंतर मी चालू लागलो आणि मला चालता येईना. उतारावर खूप चालल्यानंतर पाय खिळखिळे होतात तसं झालं असावं, असं मला प्रथम वाटलं. पण चालताना एखाद्या पावलावर जोर देताच सबंध शरीर इतक्या जोरानं वर उसळू लागलं की मला भीतीच वाटू लागली. मग मी जपून पावलं टाकू लागलो तर पावलावर माझ्या शरीराचा तोलच राहात नाहीसा झाला.

पन्नास पावलांनंतर माझ्या ध्यानात आलं की, माझे पाय अशक्त झालेले नसून ही दुसरी कोणती तरी बाहेरची शक्ती माझा तोल घालवीत आहे. माझं वय साठीच्या वर होतं नि मी जरी आंधळा होतो, तरी माझं पूर्वायुष्य एंजिनिअर म्हणून धरणांच्या कामांवर उघड्या हवेत गेलेलं होतं. माझ्या ताकदीबद्दल मला अजून अभिमान होता.

चालता चालता माझ्या ध्यानात आलं की, माझा जाणारा तोल शरीराच्या विशिष्ट हालचालीनं सावरता येतो एवढंच नव्हे, तर माझी चालही त्यामुळे जलद होऊ लागली आहे. प्रत्येक पाऊल जमिनीवर पडलंच पाहिजे ही आपली सवय तिथे उपयोगाची नव्हती. पायाच्या अंगठ्यानं जमिनीवर दिलेल्या लहानशा जोरानं शरीराला गती मिळत होती. पन्नास पावलांनंतर माझ्या ध्यानात आलं की मी जवळ-जवळ अधांतरी चालत आहे.

पण चालण्याची ही गंमत फार वेळ टिकली नाही. अचानक माझे दोन्ही पाय जमिनीवर संपूर्ण टेकले गेले नि इतके जड झाले की खुंटा रोवावा तसा मी

उभा राहिलो. क्षणभर या प्रकारानं मी बावरलो. दुसऱ्या क्षणाला बाजूच्या दोन झुडुपातून मला हुकूम झाला,—

" बाबूजी ! तुम्ही आमचे कैदी आहात ! "

त्याचवेळी अंगाला चापून बसेल असा पोशाख घातलेले चार तरुण माझ्याकडे त्वरेनं आले. त्यांची माझ्याकडे येण्याची तऱ्हा मी पाहातच राहिलो. ते चालत येत नव्हते, जवळजवळ तरंगत येत होते. त्यांनी माझ्याभोवती गराडा घातला. तेवढ्यात एक वयस्क माणूस त्याच झाडीतून पुढे आला. माझ्याकडे निरखून पाहात तो म्हणाला,

" चला "

मी माझ्या जड पायांकडे पाहिलं. दुसऱ्याच क्षणाला आपल्या हातांतील पिस्तुलासारखी वस्तू त्याने माझ्या पायांकडे रोखली. पायांतला जडपणा त्याक्षणी विरघळला. मी ते नेतील तिकडे जाऊ लागलो.

नेणारे कुठे नेताहेत हे मला अर्थातच माहीत नव्हतं. काही वेळ मी माझं कुतूहल दाबून ठेवलं. शेवटी न राहवून त्यांच्या मुख्याला विचारलं,

" मला कुठं नेता तुम्ही ? "

माझ्याजवळ येऊन तो माझ्या शेजारून ' चालू ' लागला. चालता चालता त्यानं आपल्या खिशातील एक काच माझ्या डोळ्यांपुढे धरली. मग ती खिशात टाकीत तो म्हणाला,

" तुम्ही आंधळे आहात काय ? "

मी ' हो ' म्हटलं.

तो म्हणाला,

" मग तुम्हांला धास्ती नाही. "

मी विचारलं—

" मी डोळस असतो तर ? "



" आमची चौकी जवळ येताच तुमचे डोळे आम्ही बांधले असते  तिथे तुमची माहिती घेऊन तेथूनच आम्ही तुम्हांला परत दरीतून वर पोहोचवलं असतं!'

मी श्वास टाकून म्हटलं,

" आता तुम्ही मला परत धाडणार नाही ?"

" तुमची मर्जी असेल तोपर्यंत तुम्हांला राहता येईल. तुमच्या आंधळेपणाची मी आता पहिली चाचणी केली. तुम्हांला पुढे आमच्या क्षेत्रशाळेत नेऊन आणखी तपासण्यात येईल. तुम्ही आंधळे आहात हे तुमच्या चालण्यावरून आम्ही ओळखलं. आमच्या या पायवाटेतून डोळस माणसाला फार सावकाश जावं लागतं."

मी विचारलं,

" हा आंधळ्यांचा देश आहे काय ?"

" इथे आंधळे कुणी नाही. आमच्या देशात कुणाही डोळसाला येण्यास आज्ञा नाही. बाहेरच्या आंधळ्यांना आम्ही येऊ देतो."

मी विचारलं,

" का ?"

" मला जे थोडं माहिती आहे ते सांगतो. हा आमचा देश एका आंधळ्या ऋषीनं वसवला. तुम्ही आलात त्या रस्त्यानंच तो प्रथम या दरीत आला. त्यानंच वरून येणाऱ्या आंधळ्याला इथं मानानं प्रवेश मिळावा अशी आज्ञा देऊन ठेवली आहे. तुम्हांला इथं कुणी त्रास देणार नाही, पण तुमची बुद्धी किंवा शक्ती या देशासाठी तुम्ही दिली तर तिचाही स्वीकार होईल. तुम्हांला जमेल ते काम इथं करावं लागेल."

तरुण सैनिकांपैकी एकजण मधेच संतापानं ओठ दाबीत म्हणाला,

" ही आज्ञा लवकरच आमच्या घटनेतून काढली जाईल."

सैनिकाला हातानं दाबून अधिकारी म्हणाला,

" त्या पोराकडे लक्ष देऊ नका. तुमच्या वरच्या देशांवर आंधळ्या माणसाचं जीवन कसं असतं हे ऋषीनं चरित्रांत लिहून ठेवलं आहे. ते ऐकल्यावरूनच त्याची ही आज्ञा अगदी योग्य होती असं मला वाटतं. या पोरांना देशात जास्त लोक वाढतात याची धास्ती वाटते. पण वरच्या देशांना आंधळेपणावर इलाज मिळाला नाही तोपर्यंत तरी ही आज्ञा आम्हांला ठेवावी लागेल."



माझ्या मनात त्यानंतर भराभर प्रश्न येत होते. पण एक तर पहिल्या चौकीशी आम्ही आलो होतो आणि मला सांगितलेल्या हकीकतीमागील जे शास्त्र मला जाणून घ्यावयाची इच्छा होती, ती पुरी करण्याइतकं ज्ञान सरहद्दीवर ठेवलेल्या सैनिकांना असण्याचं कारण नव्हतं. हे मनात येऊन मी गप्प राहिलो.

पहिल्या चौकीवर माझं नाव, गाव, देश, वगैरे नोंदवून घेण्यात आलं. जो माणूस हे घेत होता तो कोणत्या लिपीत लिहीत होता हे मी पाहिलं. तो कुठ-ल्याही लिपीत लिहीत नव्हता. कागदांच्या लांबलचक तुकड्यांवर तो भराभर टाचणीसारख्या आयुधानं भोकं पाडीत होता. त्याचा वेग लिहिण्यापेक्षाही फार जलद होता. कारण माझं सबंध नांव, व्यवसाय, पत्ता, देश इत्यादी लिहायला त्याला लागला त्याहून तिप्पट वेळ मला नक्की लागला असता.



प्रश्न विचारून त्यांची नोंद घेऊन होताच, तोच अधिकारी म्हणाला,

“ तुम्हांला नशिबानं आज थांबावं लागणार नाही. तुम्हांला पुढे नेण्यासाठी वाहन बाहेर तयार आहे ? आमचे एक तपासनीस अधिकारी आले आहेत. त्यांनाच मी तुम्हांला घेऊन जावयाला सांगतो. ”

५.

# अजब देश



लौकरच या अधिकाऱ्याची नि माझी ओळख करून दिली गेली नि आम्ही दोघे त्याच्या वाहनात बसलो.

वाहन ! ते वाहन कसले ? तो धर्मराजाचा रथ होता. ते चालताना वाऱ्याचाच जेवढा आवाज येईल तेवढा. जमिनीपासून दोन-तीन फूट वर तरंगून ते धावत होतं. मी ते कसं चालत असावं याचा अंदाज घेऊ लागलो. माझ्या परिचित वाहनात ते कुठेच बसेना. मी असा विचार करीत असता त्य अधिकाऱ्यानं विचारलं,

" तुम्ही वरून आलात तर ? "

मी म्हटलं,

" हो. "

" ही आमची एक सरहद्दीची चौकी आहे. इतक्या दूरच्या चौकीवर प्रथमच माझी नेमणूक झाली आहे. वरून अधून मधून लोक इथं उतरतात असं मी ऐकलं होतं. आज प्रत्यक्ष तसा आलेला माणूस मी पाहतोय. "

मी म्हटलं,

" या देशाचं नाव काय ? "

" अंधार-दरी. "

" केवढा देश आहे हा ? "

" जवळजवळ तीनशे योजने पसरलेला आहे. "

" किती वस्ती आहे ? गावं-शहरं किती आहेत ? "

" तशी तीन नगरं आहेत. पण त्यांची सरहद्द अशी नाही. तिन्ही वस्ती पसरत आता सलग झाली आहे. "

" लोकसंख्या किती होईल ? "

" सर्व मिळून पंचवीस हजार. "

मी हसून म्हटलं,

" आमच्याकडे साधारण गाव एवढया वस्तीचं असतं. "

जरा वेळ आम्ही दोघं बोललो नाही. मनात जे चमत्कार मला येथे अनुभवास आले त्याबद्दल विचारायचं होतं. पण ते कसं विचारावं हे कळत नव्हतं. एकतर मला जे चमत्कार वाटत होते, ते त्यांना वाटत नसणार! त्यामुळं त्यांचं स्पष्टीकरणही त्याला देता आलं नसतं. दुसरं असं की, अधिक चौकसपणा दाखवायलाही मी भीत होतो. तेव्हा मी दुसराच प्रश्न विचारून परत संभाषणास सुरुवात करायचं ठरवलं. प्रथम विचारावयाचा प्रश्न मी एकदा मनाशी म्हटला— ' तुमच्या देशाचा इतिहास ऐकावा असं मला वाटतंय. तसा इतिहास लिहिलेलाही असेल ! ' आणि ' लिहिणं ' वगैरे आपल्या नेहमीच्या परिपाठातले शब्द इथं किती चमत्कारिक वाटत असतील हे माझ्या झटकन मनात आलं. या देशातल्या माणसाशी बोलणं किती कठीण होतं, हे तुमच्या ध्यानात येईल. पाहणं, वाचणं, लिहिणं, आपले नित्याचे सर्वच संकेत इतके निराळे असणार हे पदोपदी लक्षात येऊन बोलताना मला शब्द शोधावे लागत होते. शिवाय ' आंधळेपण ' या व्यंगाची जी एक करुण भावना आपल्या मनात रुजलेली असते तीही आड येऊन त्याबद्दल बोलणं अवघड होत होतं. मी शेवटी हिय्या करून विचारलं,

" तुमच्या देशाला इतिहास असेलच. मला सांगाल का तो ? "

तो म्हणाला,

" वरून आलेल्या एका ऋषीनं आमचा देश

स्थापला. त्याआधी कदाचित इथं वस्ती असावी. ती रानटी होती. त्या आमच्या पूर्वजांना या ऋषीनंच शिकवून वर आणलं. ”

“ ऋषी आंधळा होता ? ”

“ नव्हता. पण इथले लोक मात्र आंधळे होत चालले होते. ऋषीनं पुढे आपले स्वत:चे डोळे काढले अशी कथा आहे. ”

मी म्हटलं,

“ त्याला तुमचा आदिपुरुष म्हटलं पाहिजे. ”

“ आम्ही त्याला परमेश्वराच्या खालोखाल मानतो. आमच्या देशाचा पुराण इतिहास सर्व त्याच्याशी निगडित आहे. असं म्हणतात की, जग निर्माण झालं तेव्हा हिमालयाबरोबरच आमचा देश इथं घडला. तेव्हा हिमालयाची शिखरं गर्वानं वरवर जाऊ लागली, पसरू लागली. हिमालय आता देवांची नि माणसांची सर्व सृष्टी व्यापणार अशी भीती उत्पन्न झाली. तेव्हा देवालाही चिंता पडली. आमच्या पूर्वज ऋषीनं देवाचा आशीर्वाद घेऊन हिमतीनं हिमालयाच्या शिखरांमध्ये उडी ठोकली आणि वरवर चढणाऱ्या नि पसरणाऱ्या शिखरांना कापून टाकण्यास सुरुवात केली. देवानं त्या वेळीही साह्य देऊन कापलेली शिखरं समुद्रात फेकली. अनेक वर्षं ही लढाई चालू होती. शेवटी हिमालय शरण आला आणि त्यानं हा देश असलेली जमीन मोकळी सोडली व आपली शिखरं आटोपती घेतली. पण या भयंकर रणकंदनात पृथ्वीतून जी शक्ती बाहेर पडली ती या दरीत कोंडून राहिली. या शक्तीमुळंच ऋषीचे डोळे गेले आणि इतर माणसांचेही गेले असेही म्हणतात.

जरा थांबून तो तरुण अधिकारी म्हणाला,

“ अर्थात् ही पुराण कथा आहे. पण सर्वांची या कथेवर श्रद्धा आहे हिमालय शरण आला तो दिवस आम्ही उत्सवानं साजरा करीत असतो. ”

इतका वेळ आमचा रथगाडा जमिनीवरून काही अंतर ठेवून अधांतरी चालला होता. वेगात असूनही शरीराला कंपसुद्धा भासत नव्हता. एकाएकी आमच्या गाड्यानं अचका घेतला समोरच्या उंचावलेल्या दगडाच्या एका डोक्यावर तो आदळणार असं वाटलं. पण थोडक्यात मोठ्या कुशलतेनं आमच्या सारथ्यानं अपघात टाळला. गाडीला बसू लागलेले अचके आता वाढू लागले. जरा सचिंत आवाजात त्या तरुणानं म्हटलं,

“ वादळ सुरू झालं वाटतं ! ”

वादळ ! मला अगदी चमत्कारिक वाटलं. वाऱ्याची लहानशी झुळूकसुद्धा नव्हती.· आकाशात एकही ढग नव्हता. मी नकळतच म्हटलं,

" वादळ ! कसलं वादळ ? '

गाडा खाली जमिनीवर टेकवीत तो म्हणाला,

" आपण जरा थांबणंच बरं ! वादळ वाढलं तर क्षणात गाडीचा चक्काचूर होईल. आणि जंगलातून वाट काढता काढता जीवंतही राहणार नाही आपण. "

वारा नसताना वादळ कसं होतं, हे सारखं त्याला विचारावं असं मला वाटत होतं. पण अजून असले प्रश्न विचारायला मला भीती वाटत होती. जरा वेळ आम्ही थांबून राहिलो आणि सुदैवानं वादळ न वाढता शमलं.

वाऱ्याशिवायचं हे इथलं वादळ किती भयंकर असतं, याचा अनुभव मला पुढे घ्यायचा होता. पण या शिवायही या वादळाहूनही भयंकर अनुभवातून आपल्याला जायचं आहे, हे त्या वेळी मला ठाऊक नव्हतं. त्यामुळे 'वादळ संपलं' असं म्हणून गाडी सुरू करताच मीही पुन्हा सुखावून आत बसलो नि अंधारदेशातला पुढचा अजब प्रवास सुरू झाला—"

म्हाताऱ्याची पांडुरंगपंतांची —— हकीगत ऐकण्याची आमची उत्सुकता वाढली होती. पण त्यांचं वय नि त्याला आलेला थकवा यांचा विचार करून त्या रात्रीची आपली हकीगत थांबवून त्यानं विसावा घ्यावा, असं आम्ही ठरवलं.

रात्री मला जरा उशिराच झोप लागली. लहानपणी अरेबियन नाईट्स वाचताना जसा मी अस्वस्थ होऊन भारावलो, तसं काहीसं मला वाटू लागलं होतं. माझा वकील मित्र भारावला होता. नाट्यमय अनुभव नि माणसं यांनीच ज्याचं व्यवसायातलं जीवन वेढलेलं

असतं, अशा या गृहस्थाला सुद्धा म्हाताऱ्याच्या हकीगतीनं चटका लागावा, हे विशेष होतं.

या हकीगतीत मोलाचं काही मिळेल, असं सांगता आलं नसतं. राजकीय दृष्ट्या मोलाचं नव्हे; पण वैचारिक दृष्टीनंही. तरीसुद्धा लहानपणच्या गोष्टी ऐकण्यातला एक निर्व्याज आनंद त्यात नक्की होता. अशा कथा एक नवं कल्पनेचं विश्व आपणापुढे उभं करतात. पण मोठेपण येत असता हळूहळू विश्वाशी होणारा अतिपरिचय नि वाढत्या वयाबरोबर येणारं व्यवहारी ज्ञान यामुळं या विश्वाला आपण पारखे होत रहातो. मुलांच्या गोष्टी चालू असतात व आपण पाठ फिरवून उद्याच्या काळज्या मनाशी जपत बसतो. कल्पनांची विश्वं इतकी पोरकट असतात का? व्यवहारात ती इतकी निरुपयोगी असतात काय? मी एवढंच म्हणेन की, म्हाताऱ्याच्या हकीगतीनं बालपणाच्या दिवसातला आनंद मला दिला. स्वैर नि मनमोकळ्या कल्पना मी ऐकल्या. हा आनंद काही कमी नव्हता. त्या आनंदातच मी खूष होतो व त्या आनंदातच गोष्टीतले दुवे स्वतःशी उजळत मी काही वेळ जागा राहिलो नि झोप येण्याची धडपड न करता झोपलो.

सकाळी चहानंतर आमची बैठक बसली. सुदैवानं माझ्या मित्राचा तो सुट्टीचा वार होता. आम्हाला कुणी त्रास देऊ नये, व भेटावयास येणाऱ्यांस आत पाठवू नये, अशी त्यानं नोकरांना आज्ञा दिली.

म्हाताऱ्यानं हकीगतीस सुरुवात केली :



आपण नव्या प्रांतात किंवा प्रदेशात गेलो की, प्रथम आपल्या देशापेक्षा जे निराळं दिसतं तेच आपल्या नजरेत येतं. किंबहुना प्रवास त्याच हेतूनं होतो. आपल्या भारतात तुम्ही दक्षिणेकडून उत्तरेकडे गेलात तर बैलगाड्यांचे आकार किती तऱ्हेचे असतात हे पाहून नवल वाटतं. आपण एखादी गोष्ट पिढ्यान पिढ्या ज्या तऱ्हेनं करतो किंवा पाहातो त्याहून निराळ्या तऱ्हेनं ती करता येते व पाहता येते हा परदेशगमनाचा फायदा मला त्या नव्या देशात भरपूर मिळाला.

एखादा देश कळायला आधी त्यातली वरवरची वैचित्र्ये पचवावी लागतात. देशातील माणसं नंतर कळू लागतात. आपल्याहून वेगळ्या पोषाखातल्या माणसाकडे प्रथम पाहताच तो माणूस सर्व पोषाखच वाटू लागतो. मग परिचया होतो नि त्या पोषाखातल्या व्यक्ती निराळ्या निराळ्या कळू लागतात.

योगायोगानं या देशाचं काहीसं 'दर्शन' पहिल्याच सहलीत मला लाभलं.

त्या देशातलं सांगताना 'पाहिलं', 'दिसलं', 'दर्शन,' इत्यादी सारे शब्दप्रयोग चुकीचेच ठरतील. पण वस्तुमात्र कळण्याचा जो तिकडचा नेत्रहीन प्रकार, त्याला इकडील शब्द नसल्यानंच मी पाहाणं—दिसणं—

६.

# अद्‌भुत प्रवास



दर्शन इत्यादी आपले नेहमीचे शब्द वापरणार आहे.

आपल्या देशाची मला कल्पना देण्यासाठी माझ्या त्या पहिल्या तरुण सहकाऱ्यानं मला बरेच लांबपर्यंत हिंडवून आणलं. तेथील वस्तीचा पहिला देखावा दिसू लागल्यावर सिंदबादसारखा मी चकित झालो. फक्त सिंदबाद ज्या मोकळेपणानं सर्व अजब नवं पाहात गेला तो मोकळेपणा माझ्यात नव्हता. सिंदबाद हा जाणूनबुजून धाडसाला निघालेला होता. मी माझ्या अधुपणामुळं काहीसा सक्तीनं बाहेर पडलो होतो. सिंदबाद वयानं तरुण होता व नवं नवं घेण्याची त्याची ऊर्मी ताजी होती. मी वयानं थकलेला व आयुष्यातल्या ज्या काळात भौतिक गोष्टींचं काही वाटत नाहीसं होतं त्या काळातून मी जात होतो.

असं असूनही प्रदेश पाहता पाहता माझं वय विसरून मी अतिशय रंगून गेलो. ईश्वरा, तुझे वैचित्र्य अगाध आहे, असं सिंदबादप्रमाणे मला म्हणावंसं वाटलं.

प्रथम मला नवल वाटलं ते सर्वत्र उगवलेल्या दाट वनस्पतींचं. त्यांची वाढ इतकी विलक्षण होती ! साधं गवत सुद्धा तिथं घराच्या पहिल्या मजल्या-इतकं वाढत होतं. झाडंही त्याच प्रमाणांत उंच होती. सर्व झाडांची वाढ सुरूच्या झाडासारखी निमुळती व उंचावलेली. वनस्पतींच्या जाती जरी त्याच होत्या, तरी या विशिष्ट आकारामुळे सुरूच्या वनातून जात असल्याचा भास होत होता. पानांचे आकार निमुळते व लांब नि वर्ण सोनेरीकडे झुकलेला. त्यामुळे देखाव्याच्या अद्‌भुततेत आणखीनच भर पडत होती. वनस्पतीच्या या वाढीमुळे वस्तीचा पत्ताच लागत नव्हता.

त्यामुळेच पालवीत दडलेली पहिली काही घरं मला नकळत मागे गेली

असली पाहिजेत. पहिलं घर जेव्हा मी पाहिलं तेव्हा माझ्या नजरेवर माझा विश्वासच बसेना. घराला पायाच नव्हता. असं म्हणण्यापेक्षा ते जमिनीवर टेकलेलं नव्हतं, असं म्हणणं योग्य ठरेल. घरांच्या तळाखाली, जिथलं रान काढलं होतं त्या घरांवरून घरं साधारण जमिनीपासून तीन-चार फुटांवर अधांतरी उभी आहेत हे मला कळलं. घरात शिरण्यासाठी दरवाजाला धरून दोन पातळ वासे जमिनीकडे सोडलेले होते.

घरांचे आकार तसे लहान होते. एखादा मजला—वर गच्ची. मात्र घरं वर निमुळती होत गेलेली होती. अधांतरी उभे असलेले हे डोलारे पाहून मला क्षणभर भीतीच वाटली.

बहुतेक घरांच्या डोक्यावर एक भल्यामोठ्य आकाराचे चक्र दिसत होते. घरापासून ते अलग होते घरबांधणीच्या फॅशनेबल प्रकारातला हा आकार असावा असं मला प्रथम वाटलं. "ही चक्रं कशासाठी आहेत?" असं मी माझ्या सहकाऱ्याला विचारलं, तेव्हा तो म्हणाला,

"प्रत्येक घराची वीज या चक्रातून मिळते. घरातले दिवे किंवा इतर विजेची उपकरणी आम्ही यावर चालवतो."



मग माझ्या ध्यानात आलं की, आमच्या शहरातून डोक्यावरून तारांचे जाळे नि रस्त्यावरचे विद्रूप खांब दिसतात ते इथं दिसत नाहीत खरे! आफ्रिकेतल्यासारख्या एखाद्या वस्तीतून आपण जात आहोत अशा कल्पनेतच मी असल्यानं मला ते खटकलं नव्हतं. विद्युत्-शक्तीचं उत्पादन आणि वितरण आपण करतो ते यांच्या पद्धतीपुढे किती खेडवळ वाटेल हे माझ्या मनात येऊन गेलं. भोवतालच्या दाट रानाकडे हात करून माझा सहकारी म्हणाला—

" ही वनं आमची डोकंदुखी आहेत. वनस्पतींना वाढायला जरा फुरसत दिली तर आमची घरं, आमची शहरच्या शहरं, पाहाता पाहाता ती खाऊन टाकतात. सात शतकांपूर्वीची गावं आता जंगलात बुडलेली सापडली आहेत. यावरूनच बहुधा धडा घेऊन आम्ही नंतर झाडांची नियमित कापणी सुरू ठेवली. प्रत्येक भागाचा कापणीचा दिवस ठरलेला असतो. सेवक येऊन त्या दिवशी कापून जातात.

मी विचारलं,

" सेवक ? सेवक कोण ? "

दचकून स्वतःला सावरल्यासारखं करीत तो म्हणाला—

" काही नाही ! मला सेवक कोण आहेत माहीत नाहीत. आम्ही कधी विचारत नाही. "

या प्रश्नावर त्यानं मला एकदम तोडलेले पाहून मी तो विषय टाळायचं ठरवून विचारलं,

" सगळीकडे किती शांत आहे इथं ! "

तो म्हणाला,

" शांत ! असायचं तसंच आहे. "

मी म्हटलं,

" मी आमच्याकडील शहरांशी तुलना करतो आहे. आमच्या रस्त्यांवरून मोटारी, रिक्षा, टांगे, माणसं यांचा इतका कलकलाट असतो ! शिवाय रस्त्यातून जात असता इमारतीतून रेडिओचं एक संपूर्ण गाणं सहज ऐकता येतं. घराघरातून तो आवाज घुमत रस्त्यावर येत असतो. "

तो म्हणाला, " इथं गाणं ज्याचं तो ऐकतो. मोठ्या आवाजात ते लागतच नाही. "

" म्हणजे, तुमच्याकडे रेडिओ आहे ! "

" बिनतारी यंत्र ना ? "

" हो. "

" आहेत ती यंत्रं ! मात्र आम्ही त्यांना दंतयंत्रं म्हणतो. "

" मग आमच्याकडच्यासारखे वर बांबू व तारा दिसत नाहीत घरांवर ? "

" बांबू नि तारा ? "

मी हाताच्या तळव्यावर बोटानं एरियलची आकृती काढून ही तार

रेडिओला कशी जोडलेली असते हे दाखवलं.

हसून तो म्हणाला,

" समजलं. इतकं जंबाल दंतयंत्राला लागत नाही. "

त्याने आपल्या खिशातून एक पेराहून लहान घडी काढली नि झटकन् दातावर बसवली. मग ती काढून तो म्हणाला,

" दाताला ही लावली की आम्हाला आतल्या आत ऐकू येतं. तुम्ही लावून पाहा. "

मी ती घडी दातावर बसवताच खरोखरच मला कानाच्या आतून ऐकू येऊ लागलं. आणि येणारे सूर इतके शीतल-मंद सुखकारक होते ! बाहेरून आवाज ऐकणं हे किती त्रासदायक असतं हे कळून मी चकित झालो. गमतीनं मी म्हटलं,

" दाताला लागणाऱ्या या तुमच्या यंत्रांचा एक मोठा गैरफायदा आहे. रेडिओ ऐकता ऐकता बोलणं किंवा खात बसणं—सिगारेट ओढणं वगैरे काही करता येणार नाही. "

आम्ही आमची शहराची सहल संपवून माझ्या सहकाऱ्याच्या घरी आलो. मी दारात येताच घरच्या लोकांपैकी तिघे-चौघे पुढे आले व हात जोडून त्यांनी माझं स्वागत केलं.



७.

# अतर्क्य माणसे



पहिल्या काही वेळातच चटकन् एक गोष्ट माझ्या नजरेत भरली की, सर्वांच्या हालचाली अतिशय मंद आहेत. प्रथम मला वाटलं की परक्यासमोर वागण्याचा हा सभ्यतेचा प्रकार असावा. म्हणून पहिले उपचार संपून आपल्या गतीनं ती हालचाल करतील याची वाट मी पाहू लागलो. त्यांच्या हालचालीत काही फरक पडला नाही. पण हळूहळू त्या हालचाली करताना त्यात दिसणारी ऐट, गतिसौंदर्य, या सर्वांनी मला खरोखरच मोह टाकला.

घरात मध्यम वय ओलांडलेले त्यांचे आईवडील होते. लग्नाला आलेली बहीण व अठरा वर्षांचा भाऊ होता. पंचेचाळीशी ओलांडलेली मुलांची ती आईसुद्धा इतक्या रेखीव हालचाली करीत होती ! तिच्या तरुण मुलीनं केलेला नमस्कार, स्मित करताना हलवलेले ओठ नि पापण्यांची हालचाल; या सर्वांना अशी काही मोहक चाल होती की, कोणत्याही क्षणी तिला स्थिर रहायला सांगितलं असतं तर ते एक सुंदर चित्र झाले असते.

माझी नजर सर्वांच्याच लक्षात आली. मी जरा शरमून म्हटलं,

" क्षमा, करा ! तुमच्या प्रत्येकाच्या हालचालीनं मला मोह घातला आहे." मुलीचे वडील म्हणाले,

" ही सर्व ऋषीची नि नंतर झालेल्या ऋषीशिष्यांची शिकवण आहे. त्यानं एके ठिकाणी लिहिलंय् की, ' इथे पृथ्वीनं भारून ठेवलेल्या विशिष्ट शक्तीमुळे जोराची कुठलीही हालचाल तोल घालवते. तेव्हा हळू हालचाली करणे हे इष्ट; पण अशा हालचालीत आळस किंवा मंदपणा न दिसावा यासाठी शरीराची लहानसहान हालचाल सुद्धा सौंदर्यबद्ध करण्याचा यत्न व्हावा असं मी सांगतो. '

" ऋषीच्या या वाक्यावरून पुढील शिष्यांनी विशेष अभ्यास करून लहानपणापासून सर्वांना हालचालींचं त्या दृष्टीनं शिक्षण देण्यासाठी अभ्यास ठरवला. आता आईवडीलच मुलांना तसं वळण देतात. "

जेवणं वगैरे झाल्यावर त्यांनी मला विसावा घेण्यास सांगितलं. ज्या खोलीत त्यांनी मला झोपायला आणलं, तिथं चार भिंतींशिवाय काही सामान नव्हतं. आत जातांच भिंतीवरील एक कळ दाबून माझं अंथरूण तयार झालं. कोपऱ्यांत पलंगाच्या आकाराची एक फळी जमिनीवरून उठून वर झाली नि अधांतरी राहिली. मी दबकतच पुढे गेलो नि सावधगिरीनं फळी दाबली. माझ्या हातांच्या दाबानं ती जरा खाली झाली नि हात सोडताच पुन्हा वर आली. खोली दाखवायला आलेले यजमान हसून म्हणाले,

" बेलाशक झोपा. काही धोका नाही. "

असं म्हणून ते स्वत: फळीवर येऊन बसले नि मलाही शेजारी बसवत म्हणाले,

" आमच्या ऋषींनं म्हटलं आहे की, ' जगातल्या सर्व शय्यांमध्ये आमच्या या देशातील शय्या सुखकारक आहे. परमेश्वराचे आमच्यावर अनंत उपकार आहेत. कारण श्रमानंतर आमच्या शरीराला संपूर्ण विसावा देणारी शय्या त्यानं आम्हांला दिली. '

" आमच्या ऋषीचं हे वचन खरं की खोटं. तुम्हालाच सांगता येईल. "

मी म्हटलं,

" खरोखरच ही शय्या सुखकारक आहे. या शय्येला मी शरण आहे. "

असं म्हणून मी आडवा झालो नि डोळे मिटले. दिवसभराच्या थकव्यानं मला केव्हा झोप लागली



आणि खोलीतून यजमान केव्हा गेले, हेही मला कळलं नाही.

नेहमीच्या सवयीनं मी अगदी पहाटे जागा झालो व एकदम दचकून उठून बसलो. माझ्या हालचालीनं शय्याही वरखाली डुलत राहिली. मला एकदम हसू आलं. परक्याजागी झोपल्यावर आपण बावरतो तसा मी बावरलो होतो.





आपण कुठे आलो, पुढे काय होणार याचा विचार करीत मी जरा बसलो. इथल्या चमत्कृतींमुळे आलेलं भारावणं मनामधून जात होतं याचाच हा पुरावा होता. जगात कुठलीही गोष्ट माणसाला चिकटत नाही. चमत्कार संपतात नि स्वतःकडे माणूस येतो, तसा मी आता माझा स्वतःचा विचार करू लागलो.

मी जे काही पाहिलं ते सगळं वरवरचं होतं. ही माणसं कशी असतील, यांच्यात आपलं काय होणार? कसला व्यवसाय मला करावा लागेल? कुठं रहावं लागेल? या लोकांशी आपलं जुळेल की नाही? असे अनेक प्रश्न माझ्या डोक्यात आले. या विचारात मी असताच यजमान आत आले. आत येताच त्यांनी नमस्कार केला. मीही प्रतिनमस्कार केला.

हातानं धरून त्यांनी मला बाहेर आणलं. ते म्हणाले,

" सकाळी आम्ही थोडा उपाहार करीत असतो. आपणही त्यात भाग घ्यावा. "



मी जेवणघरात शिरताच माझ्या ध्यानात आलं की, आपल्याविषयीच तिथें आधी बोलणं चाललं असावं. सर्व विचित्र तऱ्हेने गप्प झाली होती. सगळी माझ्याकडे तोंड करून होती. फक्त त्यांच्या अठरा-वीस

८.

# संघर्ष



वर्षांच्या मुलानं एकदां माझ्याकडे तोंड वळवून झटकन् खाली मान घातली. त्याच्या तोंडावर तिटकारा नि संताप दिसत होता. हा मुलगा आपला राग का करू लागला आहे हे मला कळेना.

मुक्यानंच आमचा फराळ सुरू झाला. उपाहाराला पालेभाज्यांचा पदार्थ होता. आपण कोथिंबिरीच्या वड्या करतो तसल्याच काहीतरी लांबट वड्या होत्या. चव उग्र होती. थोडासा गोडपणा होता. विशेष म्हणजे तोंडात टाकताच तुकडा सहज विरघळत होता. चोथ्याचा अंशही तोंडात राहात नव्हता. मला नंतर कळलं, ती एक विशिष्ट वनस्पती आहे.

सर्वांचं मुकं बसणं माझ्यापेक्षा यजमानांना विचित्र झालं. ते जरा कठोर सुरात आपल्या त्या अठरा वर्षांच्या मुलास म्हणाले,

" भूदत्त ! खाताना दंतयंत्र काढून ठेवत जा. तसं चांगलं दिसत नाही. "

दातावरचा रेडिओ तिथंच ठेवून तो खात होता हे माझ्या ध्यानात आलं नव्हतं. मुलगा मान खाली ठेवून म्हणाला,

" पुष्कळ चांगल्या दिसत नसणाऱ्या गोष्टी या घरात होताहेत. "

बोलताना त्यानं झटकन् माझ्याकडे नजर टाकली. माझ्यावरचा त्याचा राग पाहून मी आणखी बुचकळ्यात पडलो. मी सरळ विचारलं,

" माझ्यावर यांचा इतका राग का ? मी जाऊ का इथून ? "

भूदत्त – तो मुलगा म्हणाला,

" या घरातून जाऊन काय होणाराय् ? "

त्याचे वडील मधे पडत म्हणाले,

" त्या माथेफिरूचं ऐकू नका. ही नवी पिढी ऋषीची सगळी वचनं विसरली आहे. भूदत्ता! तू अजून दंतयंत्र काढलं नाहीस. "

भूदत्तानं दंतयंत्र काढलं. नि म्हणाला,

" ह्या यंत्राचा आता काही उपयोग राहणार नाही. माझ्या एका मित्रानं दाताला त्रास न देता कुठूनही ऐकता येईल असं यंत्र तयार केलंय. ते आता सर्वत्र येईल. सेवक तयार करताहेत ती यंत्रं. त्यानं जेव्हा आमच्या मित्रमंडळीत ते लावलं तेव्हा इतकी मजा आली! सगळं जग नाचत उठलं. दंतयंत्र लावून आम्ही भुतांसारखे एकमेकांसमोर इतके दिवस बसून राहात होतो. नव्या यंत्रानं आम्ही सारे जवळ येऊ. आमचा पंथ जास्त संघटित होईल. "

श्वास सोडून वडील म्हणाले,

" ऐका, ऐका! पोराची बडबड ऐका! आमच्या ऋषीनं लिहिलंय ते शेवटी खरं ठरणार. दंतयंत्राबद्दल त्यानं लिहिलंय की दंतयंत्र टाकून दुसरं बाहेरून आवाज करणारं यंत्र येईल ते येऊ देऊ नका. आणि आलंच तर त्यावर नियंत्रण घाला. ही यंत्रं विचार करण्याची सवय घालवतील. ही यंत्रं नाना तऱ्हेचे सूर–प्रसंग–कथा–ओकत राहतील. प्रथम भावनोद्दीपित होऊन सर्वांना बरे वाटेल. पण पुढे ऐकणाऱ्यांच्या भावना मरून जाऊ लागतील. हास्य, करुण शृंगार, बीभत्स, क्रोध इत्यादी रसांनी ओथंबलेलं इतकं वारंवार कानांवर येईल की आयुष्यातील कोणत्याही प्रसंगाचं काही वाटत नाहीसं होईल. आणि त्यातून निर्माण झालेली ती पिढी विचार न उरलेली, बोथट, स्वतःचं काय करावं हे न कळणारी; संतापी, समाज-विन्मुख, बेछूट अशी होईल. समाज खाली घसरेल व ज्या आधीच्या पिढीनं अनियंत्रित अशी ती यंत्रं



काढली त्यांच्यावर त्यांचा दोष येईल."

टेबलावर मूठ आपटून उठत भूदत्त म्हणाला,

" नवी यंत्रं आम्ही आणणार. आम्ही ती आणू नि वाटलं तर मोडून टाकू. काही करू."

वडील हसून म्हणाले,

" ती मोडण्याचं काम तुम्ही करणार नाही. तुमची मुलं करतील."

" ठीक आहे ! तसं होईल. पण खऱ्या महत्त्वाच्या गोष्टीकडे आमचं दुर्लक्ष होणार नाही. यापुढे एकही अधिक माणूस आमच्या देशात खपणार नाही. आणि सेवकांना दिलेल्या सवलतींचाही आम्हाला विचार करावा लागेल."

माझ्याकडे ताठ मुद्रा करून तो बाहेर निघून गेला.

माझ्याकडे वळून वडील म्हणाले,

" हे असं झालंय हल्ली. खरं पाहता सेवकांची पद्धतच चुकीची आहे, आमच्या ऋषीला ती मान्य नव्हती. पण नंतर सेवकाची कल्पना निघाली. त्याबद्दल ऋषीनं म्हटलंय्, ' आपणच आपलं सर्व करणं हे या राष्ट्राला पोषक आहे. दुसऱ्यांकडून कधीही स्वतःचं काम करवून घेऊ नका. ' त्याची कल्पना तर विलक्षण होती. त्यानं लिहिलंय की, ' आपल्या या प्रदेशात विद्युतशक्तीची निर्मिती सोपी आहे. ती घरोघर होते. तेव्हा जगात इतरत्र मोठमोठे कारखाने असलेली शहरं नि गलिच्छ वस्त्या होतील, तसं होण्याचं कारण नाही. सुखसोयींसाठी आपण जी यंत्रं व सामान निर्माण करू, ते प्रत्येक घरी स्वयंपूर्ण बनेल अशाच तऱ्हेनं संशोधकांनी शोध लावण्याचा यत्न करावा. प्रत्येक घर हे लहान कारखाना, तसं लहानसं विद्यालयही बनावं. प्रत्येकाला ज्ञान लाभावं नि विचार करता यावा. कोणत्याही एका पुरुषाच्या बुद्धीवर किंवा शक्तीवर सर्व जनतेनं अवलंबून रहाणं हे चूक आहे. मलाही कुणी श्रेष्ठ मानू नये."

" पण ऋषीच्या लिहिण्याप्रमाणे सर्व झालं नाही. शेवटी माणसात कुठे तरी कमकुवतपणा राहतो. त्याचा फायदा घेणारे निघतात. सेवकांची योजना त्यातलीच आहे."



सेवक – सेवक – हा शब्द मी इतक्या वेळा ऐकला की मला त्याबद्दल विलक्षण कुतूहल वाटू लागलं. सेवक झाडं तोडतात – सेवक यंत्र बनवतात – सेवकांना फार सवलती दिल्या जात आहेत. हे सेवक कोण ? या लोकांपैकी ते नसले तर हे कुठचे ! या लोकांपैकी नसले तर गुलामांची पद्धत इथे आहे काय ? ती असती तरी नवल नव्हते. सर्व दृष्टीनं पुढारलेल्या आर्य नि ग्रीक संस्कृतीत गुलामी होतीच. सर्वांग-सुंदर–सर्वसद्‌गुणी कुणी नसतं हे आपण जाणतोच. पण तसं व्हावं ही तर आपली धडपड असते.

सकाळची न्याहरी आटोपताच बाहेर हिंडून येण्याची मी परवानगी घेतली. कुठे जायचं हे मी काही ठरवलं नव्हतं. कारण सर्व प्रदेश अनोळखी तेव्हा एक दिशा पकडून मी चालू लागलो.



झाडांची वाढ इथं किती विलक्षण असते हे मला कळून आलं. रस्त्यावर झाडाचं आक्रमण होऊ नये यासाठी दोन्ही हातांना काही उंचीवर घट्ट वासे बांधलेले होते. पण त्यातूनही पुष्कळ ठिकाणी झाडं डोकावून हात दहा हात पुढे आली होती. रस्ते मात्र अगदी खडबडीत होते. रस्त्यावर वाहनं गेल्याचं एकही चिन्ह नव्हतं.

९.

# सेवकांचं गुपित



मी ज्या वाहनातून फिरून आलो होतो, त्या तऱ्हेची एक दोन वाहनं माझ्या अंगावरून गेली. नंतर मात्र जंगलातून चाललो आहोत असंच वाटत होतं. नशीब माणसाला कुठं कुठं आणतं नि काय काय दाखवतं, असं माझ्या मनात आलं. आठ दिवसांपूर्वी मी हिमालयावरील माझ्या झोपडीत सुखानं भजन करीत आयुष्यातल्या शेवटच्या दिवसाची वाट पाहत होतो. आणि आठ दिवसां-नंतर मी अत्यंत अनोळखी देशातून चालत होतो. चालणं सुद्धा मला खरं वाटत नव्हतं. माझी स्वतःची मला भ्रांत पडलेली होती. इथं भोवती माणसं असून मी अत्यंत एकाकी होतो नि काहीसा भयभीत होतो. उलट, हिमालयात माझ्या झोपडीतल्या एकाकीपणानं माणसांच्या संगतीहून आनंद दिला होता.

अशा काही तरी विचारात चालत असता मी एकदम थबकलो. काही आवाज कानावर आले का ? मी स्तब्ध उभा राहून ऐकू लागलो. इथं या शांत शहरात बरेच दिवस न ऐकलेले आवाज अगदी मंद, पण येत होते. त्या आवाजानं मला इतका आनंद झाला जणू अनेक दिवसांचे मित्र भेटावे ! उत्सुकतेने मी आवाजांचा कानोसा घेत भरभर पुढे निघालो.

आवाज अधिक स्पष्ट येऊ लागले नि माझी छाती धडधडू लागली. आयुष्यभर ज्या आवाजाशी माझा परिचय होता तसेच ते आवाज होते. यंत्र फिरण्याचे-ओढण्याचे-कापण्याचे-घर्षणाचे नि किंचाळण्याचे ! त्या आवाजांनी माझं हृदय भरून आलं ! काय गम्मत असते पहा ! या आधी मी कारखाने नि यंत्र यांच्या दुष्परिणामाबद्दल बोललोही असेन नि इथं आल्यावर आता यापुढेही बोलेन पण माझ्या मनात मी या साऱ्या यंत्राशी कुठं तरी निगडित झालो होतो. जी यंत्रं आधीच्यांनी धडपडून शोधली नि जिला आम्हीही

हातभार लावला, ती आमचीच आहेत. त्यांचे आवाज, बऱ्यावाईट कशा का स्मृति आणोत, त्या स्मृती अशा परक्या स्थळी खात्रीनं समाधान देतात, हे माझ्या अनुभवाला आलं.

एके ठिकाणी दोन्ही हातांची झाडं एकदम संपून मी उघड्यावर उभा राहिलो. क्षणभर दचकून मी समोरचा देखावा पाहू लागलो. निदान दोन चार मैलांहून जास्त परिसरातलं रान तोडून सपाट जागा केलेली होती व अनेक इमारती त्या जागेवर उभ्या होत्या.

इमारतींना वेढा घालून भल्या मोठ्या काटेरी वाशांचं कुंपण पसरलं होतं. कुंपणाच्या हद्दीवर तीन चार ठिकाणी नाकी होती व तिथे उभे असलेले पहारेकरी दिसत होते.

एकदम माझ्या मनात, या पहारेकऱ्यांना टाळून कुठून तरी आत शिरावं नि इमारती पाहून याव्यात असं आलं. अधिक कुतूहल इथं निश्चित धोक्याचं होतं. पण त्या क्षणी तरी माझं मन आवरणं मला जमलं नाही. मी नकळतच पहारेकऱ्यांना टाळून कसं आत शिरता येईल हे निरखू लागलो.

पहिली गोष्ट मी झटकन् केली, मी उभा होतो तो खाली बसलो नि हळूहळू बसल्या बसल्या पुढे सरकू लागलो. या इमारतीत काही तरी विचित्र दिसणार याबद्दल मला खात्री वाटू लागली. एवढ्या थोड्या वेळातल्या मुक्कामात या देशातल्या शांततेनं, सुट्या, व सुखशाली वस्तीनं, अजब वाहनं, तरंगती घरं नि तत्त्वज्ञानानं एकीकडे मला स्तिमित केलं होतं; पण दुसरीकडे या सर्व देखाव्यामागे काही तरी लपलेलं आहे ही भावना तरंगत आली होती. तिचं समाधान इथं होणार याबद्दल मला खात्री वाटू लागली.



कुंपणाच्या दोन दूरच्या चौकीमधली एक जागा नजरेसमोर ठेवून मी हाता-पायावर चौफेर होऊन भराभर पुढे जाऊ लागलो.

जवळ जवळ तीन चार तासांनंतर मी आत हिंडून परत कुंपणातून बाहेर येऊन पुन्हा सरपटत रानाच्या झाडीशी आलो. मगच उभं राहण्याची नि चालण्याची हिंमत केली.

निश्चितपणं मी आता यजमानांच्या घराकडे निघालो. पण त्या चार तासांत जे पाहिलं ते डोळ्यापुढून जात नव्हतं. कुंपणाशी सरपटत आलो तेव्हा क्षणभर शेजारी झालेल्या आवाजानं मी कसा घामाघूम झालो होतो! ज्या शस्त्राने आपल्याला मरण यायचं ते ठाऊक असणंसुद्धा किती धीर देणारं असतं! आपल्याइकडे मी पहारेकऱ्याला सापडलो तर काठी, गोळी, संगीन यानं मी मारला गेलो असतो. पण इथं कोणत्या तऱ्हेनं हे सैनिक माझा प्राण कुडीतून काढतील कुणास ठाऊक? कोणतं अस्त्र त्यांच्याजवळ असेल व ते कसा जीव घेत असेल!

त्या चार तासांत मी जे पाहिलं नि ज्यांच्याशी मी जे बोललो त्या सर्वांची उजळणी करीत माझी पावलं पडू लागली.





आण घराकडे येता येता कारखान्यात शिरल्या पासून झालेलं तें सारं माझ्या डोळ्यापुढे येत होतं. कुंपणात शिरताच मोठा भोंग सुरू झाला होता. मी दचकून कोसळलोच होतो. मला नक्की वाटलं की, माझ्या पायाच्या दाबानं कुंपणात ठेवलेली एखादी कळ दाबली गेली नि आता चहूबाजूनं आपल्यावर 'संगिनी' रोखल्या जाणार किंवा एखाद्या अपरिचित अस्त्रानं भस्म होणार. धडपडत, तिथेच पडलेल्या एका भल्या मोठ्या पुरुषभर व्यासाच्या नळ्याच्या तोंडात मी शिरलो नि जेवढं आत घुसता येईल तेवढे घुसून आतल्या अंधारात धागधुग करीत उंदरा-सारखा दडून राहिलो.



पण काही वेळातच माझ्या लक्षात आलं की, तो भोंगा सुट्टीचा होता. कामावरून सुटलेल्या माणसांची परिचित गडबड ऐकू येऊ लागली. नळ्यातून बाहेर सुटण्याची हीच वेळ आहे असं ठरवून मी पुढे येणार तोच तोंडाशी सावली पडली नि दुसऱ्याच क्षणाला माझा थरकाप उडवीत एक माणूस आत आला.

तसाच दबून मी काय होतंय ते पाहू लागलो. मान वाकवून आत येत त्या माणसानं तोंडाशीच बैठक मारली नि खिशातून एक पुरचुंडी बाहेर काढून

१०.

## कारखाना



उलगडली. आपले दुपारचे जेवण तो जेवू लागला.

हा माणूस आंधळा नाही ही पहिली गोष्ट माझ्या ध्यानात आली. आपल्याकडील कामगाराचाच तो नमुना होता. त्याचं असं कोपऱ्यात येऊन खात बसणं मला तेव्हा किती सहृदय आणि माणुसकीचं वाटलं होतं! त्याला जाऊन मिठीच मारावी, असं माझ्या मनात आलं होतं.

पुरचुंडी गुंडाळून जेवणानंतरची बैठी वामकुक्षी घेत तो नळ्याला टेकून बसला. 'नमः शिवाय! – अन्नदाता सुखी भव —' असं काही तरी पुटपुटत त्यानं डोळे मिटून घेतले. आपल्यासारखा डोळस माणूस पाहून मला इतका आनंद झाला होता की, मी भान न राहवून झटकन पुढे झालो नि त्याला 'नमस्ते' म्हटलं. तेव्हा तो केवढ्यानं दचकला होता.

सुरुवातीला अर्थातच जरा बुजूनच तो बोलत होता. माझी हकीगत मी थोडक्यात त्याला सांगितली. नंतर तो मोकळेपणानं बोलू लागला. सेवक–सेवक म्हणून मी ऐकले ते लोक हेच होते. डोळस प्रदेशातून हे लोक आणले होते का? या प्रश्नाला त्यानं दिलेलं उत्तर विचित्र होतं. तो म्हणाला होता की—

"आम्ही सर्व बाहेरचेच आहोत. हा देश जादूनं भारल्यासारखा आहे. तुम्ही पाहिलंच असेल; इथं वाहनं कशी चालतात आणि घरावरची विचित्र चक्रं कशी फिरत असतात? बाहेरचा माणूस जवळ जवळ ओढला जात असावा इथं. आमच्यातल्या जुन्या कहाण्यात या देशाला मायानगरीच म्हणतात. पण ज्या अर्थी बाहेरची माणसं इथं हल्ली येत नाहीत, त्या अर्थी या देशाच्या वैभवाची भूल घालून या आंधळ्यांच्या पूर्वजांनी आमच्या पूर्वजांना फार पूर्वी इथं आणलं असावं."

मी विचारलं होतं. " पण डोळसांना इथं कशाला आणलं ? "

इमारतीकडे हात करून तो म्हणाला होता, " त्यासाठी ! हे कारखाने चालवण्यास. इतर सर्व बाबतीत हे आंधळे डोळसांपेक्षा समर्थ आहेत, पण या इथल्या विचित्र वातावरणात त्यांची शरीरं इतकी हलकी आहेत की, नेटाचं, जोर लावण्याचं काम त्यांना करता येत नाही. आंधळा घाव घालू लागला तर घावाबरोबर त्याचं शरीरच वर उचललं जातं. त्याचा तोल फार नाजूक आहे. इथं एकदा का माणूस आला की, त्याची सुटका नाही. आज माझ्याच दहा पिढ्या इथं होऊन गेल्या. आमच्यातले काही जण अजून ऋषीच्या संभ्रमात आहेत. आहे तेच सुख त्यांना वाटतं. गुलामीचीही सवय होते. पण आता पुष्कळांना गुलामीची खंत वाटू लागली आहे. आम्ही यापुढे दबून राहणार नाही. "

मी प्रश्न केला होता, " आता आणखी लोक का आणीत नाहीत ? "

तो म्हणाला होता, " त्यांच्या कामापुरती आमची संख्या झाली आहे. खरे पाहता ऋषीच्या वचनाप्रमाणे अंध व डोळस दोघांनी समानतेनं इथं रहावं असं होतं. पण ते तत्त्व ग्रंथात राहिलं. या देशात एक नवा पक्ष उत्पन्न झाला आहे. त्यांना तर एकही डोळस अधिक यायला नकोच आहे, पण आम्हांला जो थोडाफार मोकळेपणा आहे तो सुद्धा काढून घ्यावा, असे ते म्हणतात. आमची संख्या ठराविक मर्यादित राहिली, तरच आंधळ्यांचं वर्चस्व इथं टिकेल असा ते प्रचार करतात. डोळस लोक बंड करून उठतील व अंधांना गुलाम करतील, असा प्रचार करून ते लोकांना चिथवीत असतात. या नव्या पक्षाची





आम्हांला फार भीतं
" तो पक्ष
पाहिजे. आणि तो उ
चिरडून टाकले. त्या
उठाव केला पाहिजे
तेवढा वेळ आम्हांल
मी अनुभव
गलितगात्र झाला हे
घाईगडबडीनं उठत
" तुम्ही उठ
आली आहे. तुमच
मोठं काम होईल.
मला ' होय
तो निघून
रस्त्याने परतलो हे
की नाही याचाच
भानगडीत पडण्या
पण हे के
इथं गुलामीत दिस
देणं माझं कर्तव्य
प्रथम सारेच प्रश्न
प्रादुर्भाव होतो. त

आम्हांला फार भीती आहे.

" तो पक्ष येण्यापूर्वीच आम्हांला या देशात आमचा हक्क प्रस्थापित केला पाहिजे. आणि तो आम्ही करणार. यापूर्वी असे दोन तीन लढे झाले. ते अंधांनी चिरडून टाकले. त्या लढ्यांचे समय चुकले होते. ज्या वेळी वादळे होतात त्या वेळी उठाव केला पाहिजे. वादळांत अंधनिपचित होतात. वादळ अर्धा तास टिकतं तेवढा वेळ आम्हांला पुरा होईल. "

मी अनुभवलेलं वादळ मला आठवलं व माझा अंध सोबती कसा गलितगात्र झाला होता तेही आठवलं. मी काही बोलणार तोच भोंगा वाजला. घाईगडबडीनं उठत तो म्हणाला—

" तुम्ही उद्या याच वेळी इथं याल का ? माझ्या मनात एक कल्पना आली आहे. तुमचा आम्हांला फार उपयोग होईल. याच तुम्ही. तुमच्या येण्यानं मोठं काम होईल. "

मला ' होय नाही ' म्हणायला वेळ न देता तो उठून चालूही लागला.

तो निघून गेल्यावर नळ्याबाहेर येऊन मी कुंपणाशी आलो होतो नि आल्या रस्त्याने परतलो होतो. चालता चालता आपण या देशाच्या राजकारणात पडावं की नाही याचाच विचार मी करीत होतो. परक्या देशात येऊन तिथल्या भानगडीत पडण्यासारखं धाडसाचं आणि धोक्याचंही दुसरं काही नाही.

पण हे केवळ राजकारण आणि भानगडच होती का ? एक सबंध समाज इथं गुलामीत दिसत होता. जर आपली काही मदत त्यांना होत असेल, तर ती देणं माझं कर्तव्य नव्हतं का ? हा साधा माणुसकीचा प्रश्न होता. मला वाटतं, प्रथम सारेच प्रश्न साधे, माणुसकीचे असतात. त्यांत नंतर सत्ता नि लोभ यांचा प्रादुर्भाव होतो. ती मर्यादा आपण जाणली की झालं !



अशा विचारात उद्याची भेट पाळावयाचीच अशा निर्णयापर्यंत मी येऊन पोहोचलो होतो. तेवढ्यात मी थबकलो. आपल्या विचारात असल्यानं आजूबाजूला माझं तेवढं लक्ष नव्हतं, पण कडेला एक रथ उभा दिसताच मी भानावर आलो. रथाच्या शेजाराच एक आंधळं जोडपं उभं होतं. त्यातली स्त्री रडत होती.

जोडप्याच्या बोलण्यात लक्ष घालण्याचं मला कारण नव्हतं. म्हणून मी पुरुषाशी नजरानजर होताच नमस्कारासारखा हात वर करून पुढे निघालो. पण त्यानंच मला बोलावलं नि संभाषणाला सुरुवात केली.

मी इथं पाहुणा आहे नि सहज प्रदेश पहात हिंडतोय हे त्याला समजताच तो हसून म्हणाला,

" तरीच मला रथ दिसला नाही. इथं रथाशिवाय कुणीही नगरातून फिरू नये असा दंडक आहे. हवं असलं तर आमच्या रथातून चला. "

मी म्हटलं,

" नको ! तुमच्यात अडचण कशाला ? "

" अडचण वगैरे नाही, चलाच. "

मी रथात येऊन बसताना अस्वस्थ होतो. त्याची बायको अजून डोळे पुशीत होती. मी न राहवून म्हटले,

११

# एक नवी ओळख

"कोणता दुःखाचा प्रसंग आपल्यावर ओढवला आहे ? मी असं विचारलं तर राग येणार नाही ना ?" तो म्हणाला,

"राग तर नाहीच, पण आपण वयोवृद्ध आहात; आमच्या दुःखावर तुम्हालाच काही सांगता येईल. कुठं बोलता येत नाही, हे दुःख बोलून आमचं मन हलकं होईल."

नंतर तो म्हणाला—

"तुमच्या ध्यानात आलंच असेल की, मी अंध आहे, पण माझी पत्नी डोळस आहे."

इतका वेळ डोळ्यांवर वस्त्र ठेवून ती रडत असल्यानं माझ्या ते लक्षात आलं नव्हतं. असा प्रकार इथं असेल ही कल्पना नसल्यानं त्याचं वाक्य ऐकताच मी काहीसा दचकलो. तो पुढे म्हणाला,

"अशी लग्नं या देशात फार थोडी आहेत. जरी ऋषींची या विवाहांना संमती होती, तरी ती लोकमान्य नाहीत. कारखान्यावर मी अधिकारी होतो. हिला पाहाताच माझं मन बसलं. तिचीही तीच अवस्था झाली. आम्ही विवाह केला. पण पहिली काही वर्षं सुखाची गेल्यावर मूल होताच दुःखाचा वर्षावच सुरू झाला. आम्हाला मूल डोळस झालं व आजच्या कायद्यानं ते सेवकात जमा झालं. ते सेवकातच वाढवावं लागलं व मोठं झाल्यावर तेथेच तो काम करीत आहे. दर आठ दिवसांनी आम्ही त्याला भेटून येतो व दरवेळेस हिचं दुःख अनिवार होतं, आणि माझंही. आमच्यासारखी जी लग्नं झाली तेही असेच दुःखी आहेत. माझी पत्नी नेहमी दुःख करीत असते."

त्याचं बोलणं ऐकता ऐकता माझेही डोळे पाण्यानं भारावले, माणसं

आपणच आपल्या दुःखाला कारण होत असतात. किती तऱ्हेनं समाज व्यक्तीच्या यातनांना कारण होत असतो ! पण समाज करून राहण्याचेच हे भोग आहेत का ?

या जोडप्याचं समाधान कसं करावं हेच मला कळेना. इथं आल्यावर या अंध देशाबद्दल मलाही मोह पडला होता. पण शेवटी कोणताही समाज दोषरहित नसतो हेच खरं. मी त्यांना म्हटलं,

" तुमचं दुःख खरोखरच सांत्वनाच्या बाहेरचं आहे. मी काही म्हटलं तरी त्याचा उपयोग होणार नाही. पण मला एक मात्र वाटतं की तुमच्या समाजानं हे दुःख निर्माण केलेलं आहे. समाजाचे नियम आणि वृत्ती बदलणं हाच तुमच्यापुढे उपाय आहे. कदाचित तुमच्या आयुष्यात तुम्हांला त्याचे फळ चाखता येणार नाही. पण पुढची जोडपी तरी कष्टी होणार नाहीत. त्या दृष्टीनं तुम्हांला काही करता येणार नाही का ? "

जरा स्तब्ध राहून तो म्हणाला,

" तुमच्या बोलण्यात तथ्य आहे. "

मला माझ्या ठिकाणाशी उतरवून जोडपं पुढे गेलं माझ्या एकाच फेरफटक्यात या देशाचं जे अंतरंग पाहिलं त्यानं मी काहीसा कष्टी झालो होतो. यापुढे इथंच राहून हे दोन्ही समाज एकत्र कसे येतील, याचीच खटपट करावयाची मी निश्चयही केला.



या निश्चयाच्या उत्साहात मी घरात आलो नि माझ्या खोलीत पाऊल टाकलं. आत पाऊल टाकलं नाही तोच चहूबाजूनं चार लोकांनी येऊन मला धरलं नि जवळ जवळ ओढीत बाहेर आणून, मागील झाडीत लपवलेल्या रथात डांबलं नि रथ सुरू झाला.

झाला प्रकार काही क्षणांत झाला. मी भानावर

येण्यापूर्वीच रथ थांबला नि एका घरात मला नेण्यात आलं. दरवाजावरच्या दोन माणसांनी मला ताब्यात घेतलं व ते आत घेऊन गेले. ज्या खोलीत मला नेलं ती लहानशी होती. समोर एक किरकोळ माणूस बसला होता. मला पाहाताच उठून त्यानं म्हटलं,

" हाच का तो परका ? "

माझ्या लक्षात आलं की, माझ्या येण्याची वाट पाहात तो बसला होता. मला आणण्याचा सारा बेत आखला गेला होता. हाचका तो परका, या प्रश्नाला उत्तर देण्यास बाजूच्या पडद्याआडून जो तरुण पुढे आला, त्याला पाहाताच मी चकित झालो. तो भूदत्त होता !

मला समोरच्या माणसानं बसावयास सांगितलं. तेवढ्यात आणखी दोघे खोलीत येऊन बसले, मग भूदत्ताला बाहेर जाण्याची खूण करण्यात आली. टेबलाभोवती आम्ही चौघे राहिलो.

एकदम बोट पुढे करून समोरचा माणूस ओरडला,

" तुम्ही इथं या देशात का आलात ? आणि काय काय केलंत ? "

मी सरळ माझी माहिती सांगू लागलो. मला मधेच थांबवून तिघांपैकी एक म्हणाला,

" ही भाकडकथा नको. तुम्ही डोळसांना चिथावणी द्यायला आलात की नाही ? "

" नाही. " मी म्हटलं.

माझ्यापुढे ठिपक्याठिपक्यांचे चित्र टाकून तो ओरडला,

" हे तुम्हीच ना ? सेवकात तुम्ही कशाला गेला होता ? "

" सहज प्रदेश पहात गेलो. कारखाने दिसले. आत शिरलो. "

" खरं का सांगत नाही ? त्यांची उठावणी करण्याचा तुमचा बेत आहे की नाही ? कोण कोण सामील आहेत तुम्हांला ? "

" कसलाही बेत आखून मी आलेलो नाही. मी एक अंध आहे व इथं रहाण्याचा मानस करून आलो. "

रागाने तिघांचेही चेहरे फुलून आले.

" वाटेत कुणाचा रथ तुम्हांला भेटला ? तिथं काय बोलणं झालं ? "

मला इथं आणताच प्रथमतः सरकारी सैनिकांनीच आपल्याला आणलं आहे असं मला वाटलं होतं, पण भूदत्ताला पाहाताच सर्व प्रकार माझ्या ध्यानात

आला. हे नव्या पक्षाचे लोक होते. यांना दाद द्यावयाची नाही असा मी तेव्हाच निश्चय केला. एकानं ओरडून म्हटलं,

" ते जोडपंही कटात सामील आहे ना ? "

" कट वगैरे मला ठाऊक नाही. "

एकदम नरम सूर करून दुसऱ्यानं म्हटलं,

" तुम्हाला आमच्या देशात रहायचं असेल तर आम्हाला आनंद आहे. आम्ही तुमची सर्व सुखसोय पाहू. आम्हाला फक्त एक पत्र लिहून द्या. पत्राचा हा नमुना आहे. त्यावर फक्त सही करा. "

मी पत्र घेऊन वाचलं. त्यात माझ्याकडून असं लिहवून घेतलं होतं की, या देशात आपण मला स्थान द्यावं. या देशाची सेवा करण्याची संधी द्यावी. सेवकांची मी भेट घेतली व त्यात अंधांविरुद्ध करण्याच्या बंडात त्यांनी मला गोवण्याचा प्रयत्न केला.

पत्र मी अर्धंच वाचून ठेवलं नि म्हटलं,

" मी सही करणार नाही. "

तिघांनी गोंधळून एकमेकांकडं पाहिलं. माझं काय करावं हेच ते एकमेकांना विचारीत होते. एकजण म्हणाला,

" याला डांबून ठेवावा. "

दुसरा म्हणाला,

" छे ! याला सोडूनच आपल्याला उपयोग होईल. आजचा सत्तारूढ पक्ष अशा व्यक्तींना मोकळं ठेवून अंधांच्या राज्यावर कसं संकट आणीत आहे हे लोकांना दाखवता येईल. आपण ही चित्रंही लोकांपुढं आणू. आजचं सरकार डोळसांच्या बाजूचं आहे हे तरी सत्तारूढ पक्षाला मान्य करावं लागेल व रोष ओढून घ्यावा लागेल किंवा या परक्यास शिक्षा

ठोठावावी लागेल. आणि एका अंधास शिक्षा केली तरीही प्रजेला ते आवडणार नाही. तिकडूनही आपणास प्रचार करता येईल. ''

हसत तिघंही उठले. मी जणू तिथं बसलेलाच नाही अशा तऱ्हेनं बाहेर गेले. थोड्याच वेळात पुन्हा तीन–चार माणसं आत आली नि मला परत रथात कोंबलं नि घरी पोहोंचवलं.



या देशातला प्रचार किती तीव्र नि त्वरित असतो याचं प्रत्यंतर मला तेव्हाच आलं. काही तासांनंतर मी जेव्हा जेवणासाठी भोजनगृहात गेलो तेव्हा वातावरण बदललेलं दिसलं. कुणी मला बसा म्हटलं नाही. सर्वजण गप्प होते. मी जेवण अर्धं टाकून परत खोलीत आलो.

एखादी व्यक्ति कसं खेळणं होऊन बसते याचं प्रत्यंतर मला येऊ लागलं होतं. एका व्यक्तीला तोंडाशी धरून महायुद्ध झाल्याचं मी वाचीत आलो होतो. त्याचं प्रत्यंतर मला येत होतं. आपलं भवितव्य आता आपल्या हातात काहीच राहिलेलं नसून या दोन पक्षांच्या वादळात आपली होडी फुटूनही जाईल अशीच मीती मला वाटू लागली. दैवानं येणारं कुठलंही दुसरं संकट यापुढे फिकं ठरेल, याची मला खात्री वाटली. त्यात परमेश्वरावर तरी भरंवसा टाकता येतो.



आणि माझी भीती खरीही ठरली. मध्यरात्र उलटून गेल्यावर माझा दरवाजा उघडून दोन सैनिक आत आले. मला उठवून त्यांनी माझे कपडे वगैरे सामान ताब्यात घेतलं व मला दोन्ही बाजूनं पकडून बाहेर आणलं. मी 'सरकारी पाहुणा' झाल्याचं लौकरच माझ्या ध्यानात आलं.



१२.

# नको झालेला मी

मला वाटलं त्याप्रमाणे मला तुरुंगात नेलं नाही. तशा अपरात्री सहा माणसांसमोर मी पुन्हा एकदा उभा राहिलो. अशा कृत्यांना अंधसुद्धा रात्रच पसंत करतात असे दिसते. मला त्यांनी नम्रपणानं बसायला सांगितलं. मी सहाही जणांकडं पाहिलं. मला जे जोडपं वाटेत भेटलं होतं, त्यातला नवरा सहांपैकी एक होता. माझ्याकडे 'पाहून' जरा हसत तो म्हणाला,

"आमच्या देशात येऊन तुम्ही आमच्यापुढे मोठा प्रश्न उभा केला आहे."

मी म्हटलं,

"त्याबद्दल मला वाईट वाटतं. पण केवळ अंधत्वानं मला इथं आणलं. आपल्यापैकीच एक होण्याची माझी अजून इच्छा आहे."

"तुमच्या प्रश्नाचं भांडवल करून विरुद्ध पक्ष आमच्यावर कुरघोडी करीत आहे. लोकांची मनं प्रक्षुब्ध व्हावयाच्या आत या प्रश्नाचा आम्हांला निकाल लावावा लागेल."

तो जरा थांबला. मग खाकरून इतर सभासदांकडे 'पाहत' तो म्हणाला,

"माझी घरगुती बाब सर्वांना ठाऊकच आहे. मी या गृहस्थांबद्दल काही म्हटलं तर ते मत कलुषित वाटण्याचा संभव आहे. पण आपल्यापुढे मोठा बिकट प्रश्न आहे. या गृहस्थांच्या इथं येण्यात मला तरी वाईट हेतू दिसत नाही. पण यांनी जी सेवकांच्या वस्तीला भेट दिली त्यामुळं त्यांच्याबद्दल संशय उत्पन्न करणं सहज शक्य झालं आहे. आपण यांना अंध म्हणून ऋषींच्या वचना-प्रमाणं आपल्यात घेतो. पण यांचा कल सेवकांकडे, असं म्हणून त्यांना विरुद्ध पक्ष, शत्रू लेखीत आहे. अशापरिस्थितीत आपल्याला दोनच मार्ग उरतात.

एक धीर दाखवून यांना अपराधमुक्त करून नाग-रिकाचे हक्क देणं, किंवा देशघातक म्हणून शिक्षा करणं. पहिल्या करण्यानं आपण योग्य ती गोष्ट करू. पण जनमनाचा रोष घेऊ. दुसऱ्यानं जनमन सांभाळू, पण अयोग्य गोष्ट करू.

" मित्रहो ! माझ्या घरगुती बाबतीत मी व माझी पत्नी अपरिमित दुःख भोगीत आहोत. या दुःखाचा परिणाम माझ्यावर असल्यानं माझं मत यांना दोषमुक्त करून नागरिकत्व द्यावं असं आहे. "

एवढं बोलून तो गप्प राहिला, जरा वेळ शांतता होती. त्यांच्यापैकी एक वृद्ध म्हणाला,

" मला वाटतं, या पाहुण्या गृहस्थांना आपण यांचं म्हणणं मांडायला सांगू आपल्या गोष्टी तिऱ्हाइताला कशा दिसतात हे पाहणं नेहमी फायद्याचं असतं त्यावरूनही आपल्याला निर्णय घेता येईल. "

मी म्हटलं,

" आपण इथं आल्यापासून जी वागणूक मला दिलीत त्याबद्दल मी आपले प्रथम आभार मानतो. मी सेवकांच्या वस्तीत गेलो हे सत्य मी नाकबूल करीत नाही. त्यानंतर आपले प्रमुख व त्यांची पत्नी यांच्याशी माझी अवचित गांठ पडली. तेथून मी घरी येतो तो आपल्याविरुद्ध पक्षानं मला पळवलं व अनेक प्रश्न विचारून माझ्याकडून मी या देशाविरुद्ध कट करण्यास डोळसांना सहाय्य करतो असं लिहून देण्यास सांगितलं. तसं माझ्या हातून काही घडलं नसल्यानं मी तयार झालो नाही. त्यांनी मला सोडून दिलं ते केवळ मला मोकळं सोडण्यातच त्यांचा प्रचार साधेल म्हणून. '



" सेवकांच्या गाठीत मी त्यांचा असंतोष ऐकला. सहज पहिल्या भेटीतहीजी माणसे असंतोष बोलून

जातात त्यांचा असंतोष किती खोल रुतला असेल हें पहा! काही करून तुमच्याबरोबरीचे हक्क त्यांना या देशात हवे आहेत व त्यांचे मागणे मला रास्त वाटले. मी त्यांना कसलेही सहाय्य देऊ केले नाही. कारण माझ्या हातात काय आहे?

" नंतर आपले प्रमुख व त्यांच्या पत्नीची झालेली भेट. आपलंच मूल आपल्याकडे गुलाम म्हणून रहातं ही खरोखरीच अत्यंत हृदयद्रावक घटना आहे. नकळत आपला मुलगा आपली गुलामी करणं वेगळं आणि आपल्या डोळ्यासमोर आपला मुलगा गुलाम म्हणून जगणं वेगळं. हा प्रकार मला ऋषीच्या संस्कृतीला काळीमा वाटला. माझ्या देशातही असे विचित्र प्रश्न आहेत. केवळ चालीरीतींच्या हट्टानं ते उत्पन्न झालेले आहेत, व त्यांना तोडगा मिळणं कठीण असतं हेही मला समजतं. पण तरीसुद्धा मला असं वाटत की, सेवकाच्या त्या प्रकाराला तुम्ही काहीतरी केले पाहिजे. तुम्ही सर्व सूज्ञ आहात हे मला दिसतय्. नव्या पक्षाची सत्ता इथं आली तर सेवक आणखी चिरडले जातील, आणखी अन्याय वाढेल व असंतोषही. जगात कोणतेही राष्ट्र गुलामगिरी ठेवून पुढे येईल असे राहिलेले नाही. तुमच्या दोघांच्या शक्ति एकत्र झाल्या तर राष्ट्रात आणखी भरभराट होईल—"

मी एकदम थांबलो. माझा अधिकार नव्हता त्या गोष्टी मी बोललो का? क्षणभर सर्व विचारात मग्न असे बसले. इतक्यात एकानं हात वर करून खूण केली व दंतयंत्रातून तो ऐकत राहिला. काही क्षणानंतर एकदम उभे राहून तो म्हणाला,

" लोक अतिशय अस्वस्थ झाल्याची बातमी आहे. लोक रस्त्यावरून निषेध करीत हिंडत आहेत. यापल्या या अंध गृहस्थांना कडक शासन देण्याच्या घोषणा ते करीत आहेत. थांबा ! "

जरा वेळ ऐकून तो म्हणाला,

" मोठा जमाव आपल्या कार्यालयाकडे येत आहे. आपणास काय तो निर्णय त्वरित घेतला पाहिजे. "

क्षणभर विलक्षण शांतता पसरली. दुसऱ्या क्षणास त्यांच्या प्रमुखानं उठून म्हटलं,

" लोकमत विलक्षण असतं. ऋषीच्या वचनाविरुद्ध आणि आपल्या हृदयाविरूद्ध आपणास या गृहस्थांना शिक्षा द्यावी लागणार असं दिसतंय्

आपल्याला काही कल्याण करावयाचं असेल तर खोटा निर्णय घेतल्याचून इलाज नाही. दुसऱ्या पक्षानं जिंकण्याआधी लोकांना सावरणं हे पहिलं काम आहे. यापुढे आपली बाजू लोकांपुढे योग्य तऱ्हेनं मांडिली जाईल. व त्यांची मनं सत्याकडे वळतील याचीही आपण काळजी घेतली पाहिजे. केवळ सत्य म्हणून सत्याचा विजय होत नसतो."

माझ्याकडे वळून ते म्हणाले,

"आम्हांला नाईलाजानं तुम्हाला जन्मठेपेची शिक्षा द्यावी लागत आहे. तुम्ही अंध असल्यानं सेवकात तुम्हांला जावं लागणार नाही. हा निर्णय आम्हांला नाईलाजानं घ्यावा लागत आहे. लोकशिक्षणात आम्ही कमी पडलो त्यासाठी हा तुमचा बळी आहे. त्याचे सार्थक होवो."

नंतर सहकाऱ्यांकडे वळून तो म्हणाला,

"जमाव इथं येताच आपला निर्णय नि या गृहस्थांना दिलेली शिक्षा जाहीर करू या."

माझी कोठडीत रवानगी झाली. लोकमत शांत झालं. मला खरोखरीच काहीं दुःख वाटलं नाही. जन्मभर तुरुंग भोगायचायासाठी मी मनाची तयारीही केली.

मी तुरुंगात गेल्यानंतर महिन्यानं सेवकानं म्हटलेलं वादळ सुरू झालं. तिथल्या वादळाचा विलक्षण भयंकरपणा कोठडीतही मला कळत होतता. आमच्या कारागृहाच्या भिंती हलू लागल्या असं म्हणणं चूक ठरेल. भिंती हलत नव्हत्या. सबंध कारागृह डमरूसारखं नाचत होतं व नाच क्षणाक्षणाला वाढत होता. तुरुंगाचे कठडे धरून मी उभा होतो व तोल संभाळत होतो. माझ्या समोर जीझाडे नि इमारती होत्या त्यांची अवस्था बघून तर थरकाप होत होता.

झाडे उलथूनच पडत नव्हती तर उडून पलीकडे जात होती. घरं आपली जागा सोडून सरकत होती. अशा दोन हलत्या घरांची टक्कर होताच कडकडाट होऊन ती विस्कळीत होऊन पडत होती. एकही अंध बाहेर दिसत नव्हता. आमचे पहारेकरी निपचित होऊन कोपऱ्यात पडले होते.

माझ्या शेजारी काही सेवक कैदेत होते. वादळ होताच ते उत्साहाने ओरडु लागले होते. सेवक आज बंड करून उठणार असे दर वादळाचे वेळी त्यांना वाटत असावं. कोणत्याही क्षणाला आपली सुटका होईल नि आपण सत्ता घेऊ असा त्यांचा उत्साह होता. माझ्याही मनांत आलं की, जर खरोखरीच यावेळी सेवकांनी उठाव केला तर अंध, सेवक होण्यास विलंब लागणार नाही.

पण सेवक बंड करून येण्याआधीच अर्ध्या तासाचं ते भयंकर वादळ शमलं. फार न सरकलेली घरं परत जाग्यावर येऊन तरंगू लागली. नि स्थिर झाली. वाकलेली झाडं उभी राहिली नि आमचे गुंगी आलेले पहारेकरी हळूहळू ताळ्यावर येऊ लागले.

मी या वादळात अगदी स्तब्ध झालो. असं वादळ कुठं जगात होत नसेल. मला, का कुणास ठाऊक पहिल्यांदा उदास नि मग निरुत्साह वाटू लागलं. मला हिमालयातील माझ्या झोपडीचीमाझ्या मुलामुलीची, मित्रांची नि मायभूमीची आठवण येऊन रडू येऊ लागलं. मी हिमालयावरून दरीत उतरल्या-वर माझं डोकं ठणकलं तसं पुन्हा ठणकू लागलं. मी दुःखी नि अस्थ होऊन बराच वेळ तोंड गुढग्यात खुपसून बसून राहिलो.

मी मान वर केली नि एकदम दचकलो. भराभर डोळ्याच्या पापण्या उघडून मिटून मी पाहू लागलो. अंधळ्याचं दिसणं नाहीसं होऊन मला नेहमीसारखं दिसू लागलं होतं

दिसू लागण्याचा आनंद मानावा की दुःख, या भ्रमात मी असता माझी चौकशी ज्या सहा मंडळीनी केली त्यांचे प्रमुख तुरूंगाच्या दाराशी आले. मला अभिवादन करून त्यांनी विचारलं,

"आपल्याला किती त्रास झाला ?"

"विशेष नाही."

ते माझ्याकडे निरखून पहात आहेत हे माझ्या ध्यानात आलं. मी झटकन् पुढे होऊन अगदी हळू म्हणालो,

"मी आंधळा राहिलेलो नाही असं वाटतं. माझी दृष्टी परत आली

आहे. आता काय होईल ? ”

माझ्या वाक्यानं तेही दचकले; मग म्हणाले,

तुम्हाला येथून बाहेर काढलंच पाहिजे. दृष्टी आली असली तर तुम्हालासेवक करण्याखेरीज आम्हाला इलाज उरणार नाही. ”

त्यांनी इकडे तिकडे पाहिलं. पहारेकरी वादळाचा परिणाम घालवण्यासाठी, बहुधा पेय घ्यायला वर गेला होता. त्यांनी माझ्या कोठडीच्या दरवाजाकडे पाहिलं. वादळाच्या जोरात दोन गज उचकले होते. त्यांनी त्यातन बाहेर, येण्याची मला खूण केली. मी जरा गोंधळूनच बाहेर आलो. मी बाहेर येताच त्यांनी मला हळूच जाऊन त्यांच्या रथाच्या मागल्या पेटीत लपून रहायला सांगितलं.

मी असा लपल्यावर काही वेळात ते आले व मी लपलेल्या जागेकडे दृष्टीही न टाकता त्यांनी रथ चालू केला.

आम्ही बरेच दूर आल्यावर रथ थांबवून त्यांनी मला बाहेर येण्यास सांगितलं. त्यांच्या शेजारी येऊन बसताच रथ पुन्हा सुरू झाला.

समोर पहात ते म्हणाले,

“ तुम्हला शिक्षा करण्याचं पाप मी केलं होतं त्यांतून मुक्त होत आहे. मी तुम्हाला दरीच्या खाली नेऊन सोडीन. तेथून तुम्हाला परत वर तुमच्या प्रदेशात जाता येईल, तुम्ही जे नवे विचार मलादिले त्याबद्दल मी तुमचे आभार मानतो. त्या दृष्टीनं आता आम्हाला काय करता येईल ते बघू. ”



रथदरीच्या खाली आल्यावर निरोप घेताना आम्ही दोघेही गहिवरलो नि परस्परांना मिठ्या मारल्या. मला सोडवण्यात त्यांनी घेतलेला धोका मला चांगलाच कळत होता. मी परत परत त्यांचा हात दाबीत म्हटलं,

‘ तुमचं आयुष्य सुखात नि भरभराटीत जावो. तुमचा देश सुखी नि संपन्न होवो. ”

पांडुरंगपंत हकीगत सांगून एकदम थांबले. त्यांचे डोळे पाणावले होते–आमचेही. आम्ही भानावर येण्यापूर्वी ते म्हणाले,

“ इतक्या दूरच्या दरीतून मी कसा वर आलो हे तुम्हाला कळलंच असेल. मी सांगितलेली प्रत्येक गोष्ट सत्य आहे हे पुन्हा शपथेवर सांगतो. मी सांगितलेल्या देशासंबंधी काय करायचं, असा विचार तुमच्या मनात आला असेल. त्याबद्दल सांगण्याचा मला अधिकार नाही. पण त्या देशातली सेवक आणि अंध यांच्यातील विषमता कमी करण्यासाठी जर काही कार्य करता आलं तर ते साऱ्या जगाला उपकारक ठरेल. ”

म्हातारे पांडुरंगपंत गप्प झाले. माझ्या वकील मित्रानं रुमालानं नाक डोळे पुसून म्हटलं,

“ पांडुरंगपंत, तुमच्याविषयीं घेतलेल्या संशयांबद्दल माफ करा. तुमची हकीगत विलक्षण तशीच उद्बोधक आहे. तुम्ही, तुमची प्रकृती ठीक होईपर्यंत माझे पाहुणेरहावं अशी विनंतीं आहे. त्यानंतर मी तुम्हांला हवं तिथं पोहोचयाची व्यवस्था करीन.”

पांडुरंग पंत म्हणाले,

“ काल पासून मला विसावा मिळालाय. माझी प्रकृती आता ठीक आहे. हिमालयाच्या माझ्या झोंपडींत उरलेले दिवस काढावयाचे मी ठरवले आहे. तिथे तुम्ही मला सोडलेत कीं माझे मोठे काम होईल”

माझा वकील मित्र म्हणाला,

“ ठीक. तशी व्यवस्था करतो. ”

● ●





## ‘ अंधार दरी ’

ही एक शास्त्रीय परिकथा आहे

म्हातारपणीं एकाएकीं आंधळा झालेला एक गृहस्थ, उरलेले आयुष्य हिमालयांत काढावयाचे ठरवितो. हिमालयांत रहावयास गेल्यावर, त्याला जो एक विचित्र अनुभव आला त्याची ही गोष्ट आहे. ही साऱ्या लहान-थोरांचें मन रिझवील.

चांगल्या शास्त्रीय परिकथा शास्त्रांतील नव्या नव्या शोधानें भांबावलेल्या मनांना स्थैर्य आणून द्यायला मदत करतात. या कथेचा तसाहि उपयोग व्हावा.